महिपतिकृत

# श्री एकनाथ—तुकाराम चरित्र

[ मुंबई विश्वविद्यालयानें १९४६ च्या बी. ए. च्या पदवी परीक्षेकरितां नेमलेलीं 'भक्तविजयां' तील चरित्रें.]

संपादक
म. भा. भू. जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर



किंमत अडीच रुपये

बॉम्बे बुक डेपो, मुंबई, ४

# प्रास्ताविक दोन शब्द



१९४५ सालच्या बी. ए. च्या अभ्यासक्रमांतले हे मराठी पद्य वेंचे, टीपा वगैरे देऊन तयार करण्याचें काम प्रकाशकांनीं मजकडे सोपविलें होतें तें मी यथामति पार पाडलें आहे. ओव्यांचे पाठ शक्य तितके शुद्ध असावे याबद्दल फार दक्षता बाळगली आहे. संदर्भ देण्यांत व कठिण शब्दांचा अर्थ सुलभ करून सांगण्यांत बिलकुल कसूर केलेली नाहीं. उपमा व दृष्टांत या दोन अलंकारांशिवाय इतर कोणतेही अलंकार या वेंच्यांत नसल्यामुळें, अलंकारांची माहिती देण्याची आवश्यकता वाटली नाहीं.

दादर,<br>
ता. १९ मे १९४४.

ज. र. आजगांवकर

# प्राचीन मराठी वाङ्मय

मराठी भाषेची उत्पत्ति कशी आणि केव्हां झाली या संबंधानें विद्वान् लोकांत जरी अद्याप थोडासा मतभेद आहे तरी मराठी ग्रंथरचनेचा प्रारंभ शालिवाहन शकाच्या बाराव्या शतकाच्या आरंभींच झाला असला पाहिजे ही गोष्ट आतां बहुतेक सर्वमान्य झालेली आहे. जुन्यांतला जुना उपलब्ध ग्रंथ म्हटला म्हणजे मुकुंदराजांचा 'विवेकसिंधु' होय. खुद्द ग्रंथांतच या ग्रंथाचा रचनाकाल शके १११० हा दिलेला असून त्यानंतर बरोबर १०२ वर्षांनीं म्हणजे शके १२१२ त ज्ञानदेवांनीं आपला 'भावार्थदीपिका' किंवा 'ज्ञानेश्वरी' हा लोकप्रिय ग्रंथ लिहिला. ज्ञानेश्वरीरचनेपूर्वीं कांहीं वर्षें महाराष्ट्रांत महानुभाव पंथाची स्थापना होऊन त्या पंथाच्या कांहीं कवींनीं थोडीबहुत ग्रंथरचनाही केली होती व पुढील कालांत ती सारखी वाढतच गेली. आरंभींच्या महानुभावी ग्रंथांची भाषा ज्ञानेश्वरीच्या भाषेसारखीच जुनी आहे. परंतु हे ग्रंथ एका विशिष्ट पंथाच्या लोकांसाठींच मुद्दाम सांकेतिक लिपींत लिहिण्यांत आल्यामुळें महाराष्ट्रांत त्यांचा फारसा प्रचार झाला नाहीं व त्यांना सर्वमान्यता मिळाली नाहीं. इतकेंच नव्हे तर प्रसिद्ध इतिहाससंशोधक कै. वि. का. राजवाडे यांनीं कांही वर्षांपूर्वीं महानुभावांच्या सांकेतिक लिपीचा उलगडा करून महाराष्ट्र वाङ्मयमंदिराचें इतकीं वर्षें बंद पडलेलें तें एक दालन महाराष्ट्रीयांस खुलें करून दिलें त्या वेळेपर्यंत म्हणजे जवळ जवळ सहाशें वर्षें महानुभावांची ही प्रचंड ग्रंथसंपत्ति बहुतेक अज्ञातच होती. या वाङ्मयांतील कांहीं रचना खरोखरच फार सुंदर आहे व त्यांतील बऱ्याच ग्रंथांत महानुभावांचें वैशिष्ट्य असें कांहीं नाहीं; इतर जुन्या मराठी कवींच्या ग्रंथांसारखेच ते ग्रंथ आहेत. पुढें ज्ञानदेवमहाराजांनीं आपला ज्ञानेश्वरी हा ग्रंथ लिहिला आणि तेव्हांपासून सर्वमान्य असें मराठी वाङ्मय मोठ्या प्रमाणांत निर्माण होऊं लागलें. पूर्वी सांगितल्याप्रमाणें, विवेकसिंधु ग्रंथाच्या शेवटीं त्याचा समाप्तिकाल शके १११० हा दिलेला आहे म्हणूनच तो 'मराठींतील आद्यग्रंथ' मानावा लागतो. एरवी, भाषेच्या दृष्टीनें पाहिल्यास ती रचना इतकी जुनी असेल असें मुळींच वाटत नाहीं.

पद्यात्मक संस्कृत ग्रंथरचनेचेंच अनुकरण जुन्या मराठी कवींनीं केल्यामुळें बहुतेक सर्व जुने मराठी ग्रंथ पद्यात्मकच आहेत; शंभरांत एकदेखील

गद्यग्रंथ सापडत नाहीं. ओवी आणि अभंग या दोन वृत्तांत ही बहुतेक सगळी जुनी काव्यरचना आहे. श्लोक आर्या वगैरे वृत्तांत आढळणारी कविता एकंदर कवितेच्या मानानें थोडी आहे. ज्ञानदेवांचें व्यक्तिमाहात्म्य तर त्यांच्या ज्ञानेश्वरी ग्रंथांच्या लोकप्रियतेस कारणीभूत झालेंच, पण शिवाय उत्कृष्ट वाङ्मयास आवश्यक असलेले प्रतिभा, प्रसाद, कलाविलास, रसोत्कर्ष इत्यादि गुणही त्यांच्या ग्रंथांत प्रकर्षानें असल्यामुळें व अध्यात्मासारखा गहन विषय उपमा-दृष्टांतादि अलंकारांच्या साहाय्यानें सुलभ आणि मनोवेधक करून सांगण्याची त्यांची हातोटी अपूर्व असल्यामुळें त्यांची जी छाप महाराष्ट्रावर एकदां बसली ती कायमची ! पूर्वीच्या सर्व ग्रंथांस ज्ञानेश्वरीनें निष्प्रभ करून टाकलें असें म्हटल्यास चालेल. ज्ञानेश्वरांचेच समकालीन निवृत्तिनाथ, सोपान, मुक्ताबाई, नामदेव, गोरा कुंभार, जनाबाई, चोखामेळा वगैरे निरनिराळ्या जातींत होऊन गेलेल्या अनेक संतांनीं आपल्या सुलभ व प्रेमळ अभंगवाणीनें भक्ति-मार्गाचा प्रसार महाराष्ट्रांत केला व कोरड्या कर्मठपणाची नांगी मोडून टाकली. ज्ञानेश्वरी व अमृतानुभव या ग्रंथांच्या भाषेपेक्षां या अभंगांची भाषा सोपी व रचना हृदयास जाऊन भिडणारी असल्यामुळें सर्वसामान्य जनतेंत त्यांचा पुष्क-ळच प्रसार झाला व संस्कृत ग्रंथांतील अध्यात्म व भक्ति यांच्या ज्ञानाचें भांडार ती भाषा न जाणणाऱ्या लोकांस खुलें झाल्यासारखें झालें.

ज्ञानदेव समाधिस्थ झाल्यावर थोड्याच वर्षांनीं उत्तरेकडील मुसलमानी राजसत्तेची धाड महाराष्ट्रावर आली व ती राजसत्ता शिवाजी महाराजांनीं स्वराज्याची स्थापना केली त्या वेळेपर्यंत म्हणजे सुमारें ४०० वर्षें महारा-ष्ट्रावर चालू होती. हा येवढा काल म्हणजे महाराष्ट्राचें तमोयुग होय. ह्या तीन चारशें वर्षांत पिसा बहिरा, साळ्या रसाळ, नामा पाठक, विष्णुदास नामा, एकनाथ, दासोपंत, त्र्यंबक, शिवकल्याण, कृष्णदास मुद्गल वगैरे संतकवि होऊन गेले व त्यांनीं भारत, रामायण, भागवत इत्यादि सर्वमान्य संस्कृत ग्रंथांचीं सुंदर काव्यमय मराठी भाषांतरें करून लोकाची स्वधर्मनिष्ठा व स्वसंकृतिप्रेम हीं कायम राखलीं.. या सर्व कवींत एकनाथ महाराजांची कामगिरी फार मोठी आहे. प्रपंच आणि परमार्थ यांची सांगड त्यांनीं चांगल्या रीतीनें घालून दाखविली, भूतदयाधिष्ठित धर्म तोच खरा धर्म होय हें स्वोदाहरणानें जनतेस पटवून दिलें व जुनाट कर्मकांडाचें

स्तोम बरेंच कमी केलें. या कालांत ज्ञानेश्वरीच्या वेळचें मराठी भाषेचें जुनें स्वरूप पुष्कळच पालटलें व जुने शब्द मागें पडून भाषेस सौलभ्य येऊं लागलें. "व्याकरण शिकल्यानें शुद्ध कसें लिहावें आणि शुद्ध कसें बोलावें हें समजतें," हें विधान ठीक आहे, परंतु मराठी भाषेचें व्याकरण झालें नव्हतें अशा कालीं लिहिण्यांत आलेल्या या मराठी कवितेची भाषा पुष्कळच शुद्ध आहे हेंही लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

एकनाथांपासून मोरोपंतांपर्यंतची शंभरदीडशें वर्षे हा जुन्या मराठी वाङ्मयाचा उत्कर्षकाल होय. विठ्ठल, आनंदतनय, वामन, अनंत, नागेश, रघुनाथपंडित, सामराज, वीरेश्वर, वगैरे आख्यानकवि याच कालांत झाले. महाभारतकार मुक्तेश्वर हा महाकवि याच कालांत होऊन गेला. श्रीधरांनीं आपले हरिविजय, रामविजय, पांडवप्रताप वगैरे लोकप्रिय ग्रंथ याच कालात लिहिले. शिवाय तुकाराम आणि रामदास हे दोन फार मोठे सत्पुरुष व त्यांचे समकालीन रंगनाथ, जयराम, केशवस्वामी, शिवराम, यांच्या ग्रंथांचा तर तत्कालीन महाराष्ट्रावर पुष्कळच परिणाम झाला. तुकारामबुवाच्या अभंग अभंगवाणीनें बहुजनसमाजाचें अंतःकरण काबीज केलें तर समर्थांच्या धीरगंभीर गर्जनेनें किंकर्तव्यमूढ होऊन बसलेला महाराष्ट्र खडबडून जागा झाला. शिवाजी महाराजांच्या स्वराज्यस्थापनेला या संतांची प्रत्यक्ष मदत झाली असेल असें मानण्यास जरी कांहीं पुरावा नाहीं तरी त्यांनीं आपल्या आचरणानें आणि उपदेशानें, परधर्मीय राजसत्तेमुळें स्वधर्मपराङ्मुख होऊं पाहणाऱ्या जनतेची स्वधर्मनिष्ठा जागृत ठेवण्याचा जो आटोकाट प्रयत्न केला त्याचा फायदा शिवाजी महाराजांस स्वराज्यस्थापनेच्या बाबतींत झालाच असला पाहिजे यांत संदेह नाहीं.

पुढें, पेशवाई सुरू झाल्यावर संतचरित्रकार महीपति, निरंजन माधव, मध्वमुनीश्वर, अमृतराय, इत्यादि कवि झाले. यांपैकीं महीपतींची ग्रंथरचना फार सोपी असून मोरोपंतांची रचना 'संस्कृत-प्राकृत-मिश्रित' असल्यामुळें बरीच कठीण झाली आहे. पेशवाईच्या अंतकालीं पारमार्थिक काव्यरचनेस ओहोटी लागून लावण्या आणि फटके या जातीची रंगेल कविता निर्माण होऊं लागली. रामजोशी, अनंत फंदी, श्रीपत फंदी, होनाजी बाळा, सगनभाऊ, प्रभाकर, परशुराम इत्यादि लावणीकवि या कालांत झाले. देशस्थितींत व समाजस्थितींत जसजसा बदल होत गेला तसतसा काव्यविषयांतही बदल होत

गेला. पूर्वी वीररसप्रचुर पोवाडे झाले होते तसे या कालांतही झाले, परंतु एकंदरींत शृंगाररसावर भर फार. जुन्या पारमार्थिक काव्यरचनेची परंपरा मोरोपंतांबरोबरच नष्ट झाली असें मात्र कोणी समजूं नये. कारण पंतांनंतर तसली कविता लिहिणारे हंसराज, विठोबा अण्णा दप्तरदार, राजाराम प्रासादी वगैरे अनेक कवि होऊन गेले आहेत व अद्यापही दासगणूसारखे पारमार्थिक ग्रंथलेखक ती थोर परंपरा मनोभावेंकरून चालवीत आहेत. अर्थात् मी हें पारमार्थिक गद्यग्रंथांविषयीं लिहीत नाहीं.

संस्कृताऽनभिज्ञ महाराष्ट्रीयांस भगवद्गीतादि ग्रंथांतलें अध्यात्मज्ञान सुलभ करून देण्याची आवश्यकता उत्पन्न झाली त्या वेळीं, मुकुंदराज ज्ञानदेव, एकनाथ, दासोपंत वगैरे संतकवींनीं ज्ञानेश्वरी, भागवत, गीतार्णव वगैरे ग्रंथ लिहून ती गरज भागविली. असले ग्रंथ लिहिण्याचा ज्यांचा अधिकार नव्हता त्यानीं भारत, भागवत, रामायण इत्यादि इतिहासपुराणांतल्या मनोरंजक व बोधप्रद कथा आपल्या प्रतिभासंपन्न वाणीनें मराठींत उतरल्या. कीर्तनादिकांतून अशा कथा गायनयुक्त मनोरंजक रीतीनें सांगतां याव्या म्हणून वामन, विठ्ठल, आनंदतनय, मोरोपंत वगैरे कवींनीं निरनिराळ्या वृत्तांत सुंदर आख्यानरचना केली. पुढें अध्यात्मासारखा गहन विषय सामान्य जनांस फारसा आकलन होत नाहीं असें दिसून येतांच "बुडती हे जन न देखवे डोळा" अशी स्थिति झालेल्या तुकारामबुवांसारख्यांनीं आपल्या प्रासादिक, स्वानुभवयुक्त व अधिकारवती अभंगवाणीनें साध्या भक्तिमार्गाची तुतारी फुंकली. प्रपंच, राजकारण आणि परमार्थ यांचा मेळ घालून लोकांस उद्योगप्रवण करण्याची जरुरी भासली त्या वेळीं समर्थानीं प्रयत्नवादाचें महत्त्व सांगण्यासाठीं आपला ग्रंथराज 'दासबोध' लिहिला. अशा रीतीनें अनेक विषयांवर भरपूर ग्रंथरचना झाली तरी संतचरित्रें लिहिण्याचें कार्य मोठ्या आणि व्यापक प्रमाणावर त्या वेळेपर्यंत कोणी केलें नव्हतें तें शेवटीं महीपतींनी केलें. दरम्यान स्वराज्यस्थापना होऊन महाराष्ट्रांतील क्षात्रवृत्ति लोकांस आपलें शौर्य गाजविण्याची संधि सापडतांच त्यांचे गुणानुवाद गाऊन त्यांना उत्तेजन देणारे शाहीर कवि निर्माण झाले व त्यांनीं अनेक शूर आणि कर्तबगार पुरुषांवर पोवाडे रचले. पुढें रावबाजींच्या कारकीर्दीत 'यथा राजा तथा प्रजा' या न्यायानें महाराष्ट्रीयांचा रंगेलपणा वाढत चालला

व त्याबरोबर टाळमृदंगवीणादि सात्त्विक वाद्यांचा मंजुळ आवाज, डफ आणि तुणतुणें यांच्या धांगडधिंग्यांत ऐकूं येईनासा झाला. कमालीच्या शृंगारिक व अश्लील लावण्यांनीं या कालीं कहर केला होता. तथापि एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती ही कीं या शृंगारसरोवरांत अहोरात्र डुंबत असतांही रामजोशी, अनंत फंदी, होनाजी बाळा, परशुराम वगैरे लावणीकवींस महाराष्ट्रीयांच्या स्वाभाविक अंतर्मुखतेची व पारमार्थिक वृत्तीची पूर्ण विस्मृति कधींच पडली नाहीं. त्यांनाही मधून मधून पारमार्थिक काव्यरचना करण्याची उकळी येतच असे. " नरजन्मांधि नरा करुनि घे नरनारायण गडी, " ही रामजोशीबुवांची लावणी, ' घनश्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला " ही होनाजी बाळाची भूपाळी व ' येउं दे वाचे नाम देवाचें अष्टौ प्रहरा शिव हर हर ' हा अनंत फंदींचा फटका यांची लज्जत त्याच्या शृंगारिक लावण्याइतकीच बहारीची नाहीं असें कोण म्हणेल ?

कवितेचे विषय बदलत गेले तसा भाषेंतही बदल होत गला. ज्ञानदेवांची ज्ञानेश्वरी आणि महीपतींचा भक्तविजय या दोन ग्रंथांच्या भाषेंत किती तरी फरक आहे व हल्लींची चालू भाषा आणि ज्ञानेश्वरकालीन भाषा यांत तर पुष्कळच फरक पडला आहे. ज्ञानेश्वरीपासून पुढील ग्रंथांची भाषा उत्तरोत्तर सोपी होत गेली व शेवटचे मोठे कवि मोरोपंत यांच्या कवितेची भाषा संस्कृतशब्दप्राचुर्या-मुळें जरी कठिण झाली आहे तरी जुन्या मराठी भाषेंतील अपरिचित कठिण शब्दांचा फारसा भरणा तींत नाहीं. कालपरत्वें जशी ग्रंथांची भाषा बदलली तद्वतच निरनिराळ्या कवींच्या अधिकाराप्रमाणें व स्थलभिन्नतेमुळेंही त्याच्या ग्रंथांच्या भाषेंत फरक पडलेला आढळतो. उदाहरणार्थ, मुक्तेश्वर आणि रामदास यांच्या कालांत पांचपंचवीस वर्षांहून अधिक अंतर नसतांही त्याच्या भाषाशैलीत फारसें साम्य नाही. तुकाराम आणि रामदास हे समकालीन कवि पण त्यांची भाषा सारखी नाहीं. तोच प्रकार मोरोपंत व महीपति या समकालीन कवींचा. महीपतींची भाषा अगदीं सोपी तर पंतांची अतिशय कठिण !

याप्रमाणें, मुकुंदराजांच्या विवेकसिंधूपासून पंतांच्या आर्याभारतापर्यंत जी जुनी कविता झाली तिची रूपरेषा येथें दिली आहे. यासंबंधानें अधिक माहिती कोणास पाहिजे असेल तर त्यांनीं पांगारकरकृत मराठी वाङ्मयाचा इतिहास, आजगांवकरकृत 'महाराष्ट्र कविचरित्र' व भावेकृत 'महाराष्ट्र सारस्वत' हे ग्रंथ पहावे.

---

*

# प्रस्तुत पद्यवेंच्यांविषयीं दोन शब्द

महीपतिकृत 'भक्तविजय' या अत्यंत लोकप्रिय ग्रंथाचे ४५ वा व ४६ वा हे दोन व ४८ ते ५२ हे पांच मिळून एकंदर ७ अध्याय या पुस्तकांत दिले असून त्यांत प्रसिद्ध साधुकवि एकनाथ व तुकाराम यांच्या चरित्रांतील कांहीं गोष्टी समाविष्ट झाल्या आहेत. एकंदर ओवीसंख्या १५३७ आहे. या दोन्ही संतांचीं विस्तृत चरित्रें महीपतींनीं मागाहून आपल्या 'भक्तलीलामृत' या ग्रंथांत दिलीं आहेत, तीं पुष्कळ नवीन व विश्वसनीय माहिती मिळवून लिहिलीं आहेत व त्यामुळें तीं विशेष चित्ताकर्षक उतरलीं आहेत. या वेंच्याचें वृत्त 'ओवी' हें आहे. अगदीं जुन्या काळी, म्हणजे मराठींत ग्रंथरचना झाली नव्हती त्या काळीं, लग्नकार्यादि समारंभाच्या वेळीं किंवा दळतांना वगैरे जीं गीतें बायका म्हणत असत त्यांनाच पुढें कालांतरानें ओवीचें स्वरूप प्राप्त झालें व ओवीपासून पुढें अभंग झाला. ओवींतही अनेक प्रकार आहेत. मुकुंदराज, ज्ञानदेव वगैरे जुन्या कवींच्या ओव्या अगदीं लहान. उदाहरणार्थ—

**ॐ नमो जी आद्या । वेदप्रतिपाद्या ।**
**जयजय स्वसंवेद्या । आत्मरूपा** ॥—ज्ञानेश्वरी

एकनाथांची ओवी याहून जरा मोठी व तींत बहुतकरून, चौथ्या चरणांत पुनः यमक येतें. उदाहरणार्थ—

**हो कां योगियांचा आचार । करितां देखती लहानथोर ।**
**सविकल्पनिर्विकल्पविचार । न साचार कोणासी ॥**
**उद्धव अक्रूर नारद तुंबर । आणिक अपार वैष्णववीर ।**
**एके पंक्तीस शार्ङ्गधर । बैसवी साचार तयांसी ॥**

जुन्या मराठी कवितेचा तीनचतुर्थांश भाग या ओवीवृत्तांत आहे. उरलेला एकचतुर्थांश भाग अभंग, श्लोक, आर्या, पदें, आरत्या व भूपाळया वगैरे यांत आहे. मुकुंदराज, ज्ञानदेव, एकनाथ, दासोपंत, एकनाथ, मुक्तेश्वर, श्रीधर, जयराम, शिवकल्याण, कृष्णदयार्णव, महीपति, वामन वगैरे बहुतेक मोठ्या कवींची बहुतेक कविता ओवीवृत्तांत आहे. वामनपंडितानीं आपल्या यथार्थ-दीपिका या ग्रंथांत ओवीवृत्ताचा उपयोग गद्यासारखा केला आहे, म्हणजे तिच्या लांबीला कांहीं धरबंध ठेवलेला नाहीं. मुक्तेश्वरांची ओवी फार डौलदार असते. उदाहरणः—

**मागधराजा आपुले प्रौढी। सप्तद्वीप समुद्रथडी।**
**जिंकोनि राजे लक्षकोडी। कारागृहीं सूदिले ॥**

रामदासांच्या बहुतेक ओव्या जरा आंखूड, शेवटचा चरण तोकडा; पहा

**धर्मस्थापनेचे नर। ते ईश्वराचे अवतार।**
**मागें झाले पुढें होणार। देणें ईश्वराचें ॥**

प्रस्तुत वेंच्यांत ज्या दोन संतांचीं चरित्रें आलीं आहेत ते दोघेही महाराष्ट्र संतमंडळांत फार प्रसिद्ध आहेत. दोघांनींही महाराष्ट्रांत भक्तिमार्गाचा फार प्रसार केला. ज्ञानदेवांच्या खालोखाल एकनाथांची योग्यता महाराष्ट्रांत मानली जाते. लोक त्यांना ज्ञानदेवांचा अवतार असेंच समजतात. तुकोबांची लोकप्रियता बहुजनसमाजांत विशेष; त्यांना नामदेवांचा अवतार मानतात. 'ज्ञान्याचा एका, नाम्याचा तुका' हें वचन प्रसिद्धच आहे. या दोघांच्याही चरित्रांवर जुन्या कालीं व हल्लीं पुष्कळ प्रबंधरचना झाली आहे. 'केशव' नामक लेखकानें ओवीबद्ध एकनाथचरित्र लिहिलें आहे त्याचे ३१ अध्याय आहेत. महीपतींनीं आपल्या भक्तलीलामृतांत जें विस्तृत नाथचरित्र दिलें आहे तें याच केशवकृत नाथचरित्राच्या आधारानें लिहिलें आहे. गेल्या ५० वर्षांत, सहस्रबुद्धे, पांगारकर व आजगांवकर यांनीं एकनाथचरित्रें लिहिलीं आहेत.

तुकोबांविषयीं, महीपतींच्यापूर्वीं, फारसें लेखन कोणी केलेलें नाहीं. तुकारामबावांचे नातू गोपाळबावा, बंधु कान्होबा, पांडुरंग कवि इत्यादिकांनीं तुकोबांच्या चरित्रांतील कांहीं गोष्टी अभंग व ओवी वृत्तांत वर्णिल्या आहेत; आणि मोरोपंतादिकांनीं तुकोबांचीं स्तुतिस्तोत्रें गायिलीं आहेत. परंतु जुन्या कालीं लिहिलेलें तुकोबांचें विस्तृत चरित्र म्हणजे भक्तलीलामृतांत महीपतींनीं दिलेलें चरित्रच होय. अर्वाचीन काळीं, केळूसकर, धुरंधर, पांगारकर, हर्षे, पारखे, भिडे, आजगांवकर, केळकर इत्यादि अनेक लेखकांनीं तुकोबांचीं लहानमोठीं चरित्रें लिहिलीं आहेत. या दोन संतांची प्रस्तुत पद्यवेंच्यांत जी माहिती आली आहे त्यापेक्षां अधिक माहिती कोणा जिज्ञासु विद्यार्थ्यास पाहिजे असेल तर त्यानें उपरिनिर्दिष्ट गद्यपद्य चरित्रें पहावीं.

प्रस्तुत पद्यवेंचे ज्या 'भक्तविजय' ग्रंथांतून घेतले आहेत तो ग्रंथ लिहितांना,एकनाथ व तुकाराम यांच्याविषयींची जेवढी माहिती महिपतींस मिळाली होती तेवढीच त्यांनीं या सात अध्यायांत दिली आहे. महीपति हे बरेच अर्वाचीन

कवि असल्यामुळें त्यांची भाषा समजण्यास फारशी कठिण नाहीं. तींत जुने अपरिचित शब्द फारसे नाहींत. संस्कृत शब्दांचाही भरणा मोठासा नाहीं. दीडशें वर्षांपूर्वीच्या खेडवळ देशस्थ ब्राह्मणांच्या भाषेंतले बरेच शब्द, त्याचप्रमाणें कांहीं फारशी शब्द महीपतींच्या ग्रंथांत आढळतात. त्यांची भाषा रेखीव नाहीं व असावी तितकी व्याकरणशुद्धही नाहीं. 'निज' शब्दानें आरंभित होणारे 'निजप्रीति,' 'निजहित' 'निजच्छंदें,' 'निजशांति,' 'निजप्रेमें' इत्यादि शब्द महीपतींनीं इतके वापरले आहेत कीं कांहीं ठिकाणीं ते अगदीं अनन्वर्थक वाटतात. महीपतींच्या कवितेंत दृष्टांत पुष्कळ, परंतु दृष्टांताचा उपयोग गहन विषय सुलभ करून सांगण्यासाठीं असतो हें लक्षांत न घेतां अगदीं साधी गोष्ट सांगतांनादेखील ते दृष्टांतांची माळका लावतात व त्यामुळें विनाकारण ग्रंथविस्तार होतो. असे कांहीं दोष महीपतींच्या कवितेंत असले तरी त्यांची वाणी फार रसाळ, प्रेमळ व प्रासादिक असल्यामुळें भाविक वाचक तींत आरंभापासूनच रंगून जातो. हल्लींची चिकित्सक दृष्टि अर्थातच महीपतींस नव्हती व त्याबद्दल त्यांना दोष देतां येणार नाहीं. त्यांनीं जशा कथा ऐकल्या तशा त्या आपल्या ग्रंथात दिल्या. मात्र तत्कालीन समजुतीप्रमाणें, शक्य तितकें संशोधन करून विश्वसनीय माहिती मिळविण्याच्या बाबतींत त्यांनीं बिलकुल कसूर केलेली नाहीं हें अन्यत्र सांगितलेंच आहे.

———

# महीपति

**महिपतिच्या वाणीतें सेवुनि तरतात जेंवि गंगेतें ।**
**विषयांत रंगलें जें जनमानस सद्यशींच रंगे तें ।।**—मोरोपंत

" महीपतीनीं लिहिलेल्या कवितेचें सेवन करून, गंगेचें सेवन केल्याप्रमाणें लोक तरतात, आणि विषयोपभोगांत रंगून गेलेलें मन साधुसंतांच्या यशोगानांत रंगून जातें, " असा, महीपतींच्या काव्यसरितेविषयीं रसिकशिरोमणि कविवर्य मोरोपंत यांनीं वरील सुंदर आर्येंत जो अभिप्राय व्यक्त केला आहे तो अगदीं योग्य आणि यथार्थ आहे असें कोण म्हणणार नाहीं? संतचरित्रकार या नात्यानें तर महाराष्ट्र कविमंण्डलांत महीपतींचें स्थान अगदीं स्वतंत्र आहे. जुन्या साधूंचीं चरित्रें अर्वाचीन पद्धतीनें लिहूं इच्छिणारासदेखील महीपतींच्या ग्रंथांचें साहाय्य घेतल्याशिवाय गत्यंतर नाहीं इतकें सांगितलें म्हणजे वाचकांस त्याच्या कामगिरीची कल्पना होईल. आपल्या कालापूर्वी उभ्या हिंदुस्थानांत होऊन गेलेल्या बहुतेक सर्व साधुसंतांचीं चरित्रें महीपतींनीं आपल्या संतचरित्राविषयपर चार मोठ्या ग्रंथात इतक्या रसाळ वाणीनें वर्णिलीं आहेत कीं, अर्वाचीन पद्धतीचीं संतचरित्रें यापुढें कितीही बाहेर पडलीं तरी महीपतींच्या ग्रंथांची लोकप्रियता लवलेशही कमी होण्याचा संभव नाहीं. बहुजनसमाजास जो प्रेमळपणा पाहिजे, जो रसभरितपणा पाहिजे, जो प्रसाद पाहिजे ते गुण आम्हा अर्वाचीन लेखकांच्या लिखाणांत कसे येणार? रूक्ष तर्ककर्कशता आणि वाजवीपेक्षां अधिक विचिकित्सा यांच्या भरीस श्रद्धाहीनतेची जोड मिळाल्यावर, प्रेमळपणा आणि रसोत्कर्ष यांची अपेक्षा करणें हें सहाराच्या वाळवंटात नंदनवनाची अपेक्षा करण्याइतकेंच मूर्खपणाचें आहे. जुन्या संतकवींचे ग्रंथ महाराष्ट्रांतील बहुजनसमाज अद्याप मोठ्या आवडीनें वाचतो आणि आमच्या ग्रंथांकडे पाहून नाक मुरडतो याचें कारण हेंच होय. गेल्या सातशें वर्षांत शेंकडों संतकवि महाराष्ट्रांत होऊन गेले व त्यांतले पांचदहा कवि फार लोकप्रिय आहेत, परंतु त्यांतल्यात्यांत श्रीधर आणि महीपति यांचेच ग्रंथ महाराष्ट्रात अद्याप फार वाचले जातात. किंबहुना श्रीधर आणि महीपति यांनीं महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाच्या धार्मिक आणि नैतिक शिक्षणाची कायमची जबाबदारी आपल्यावर घेतली आहे असें म्हणण्यांत फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं. तर अशा या थोर सत्कवीचें संक्षिप्त चरित्र आरंभीं देऊन नंतर त्याच्या कवितेच्या गुणदोषांची यथामति चर्चा करूं.

महीपतींचे वडील दादोपंत कुळकर्णी हे मोगलांच्या पदरीं होते. तिकडून आपल्या वयाच्या ४० व्या वर्षी ते हल्लींच्या अहमदनगर जिल्ह्यांतील ताहराबाद नामक गांवीं येऊन राहिले. अहमदनगर, ताहराबाद इत्यादि नांवांवरूनच या प्रांतांत एका काळीं मुसलमानाचें किती वर्चस्व होतें याची कल्पना होण्यासारखी आहे. दादोपंत हे ताहराबाद येथें येऊन राहिल्यावर, तेथें ते स्नानसंध्या, देवदेवतार्चन इत्यादि धर्मकार्यें करून कालक्षेप करीत असत. दर महिन्यास पंढरीची वारी करण्याचा त्यांचा क्रम होता व तो त्यांनी निर्विघ्नपणें दोन तपें चालविला. पोटीं पुत्रसंतान नसल्यामुळें आपल्यामागें वारी बंद पडेल असा विचार त्यांच्या मनांत येऊन, एकदां पंढरीस असतांना, श्रीविठ्ठलाच्या चरणावर मस्तक ठेवून ते म्हणाले, "भगवंता, वारी चालू राहण्याची व्यवस्था होईल तर बरें होईल." पुढें रात्रौ ते देवळांतील एका ओरींत निजले असतां, असा चमत्कार झाला म्हणून सांगतात कीं, श्रीविठ्ठलानें स्वप्नांत त्यांच्या हातांत एक पेढा दिला व "हा आपल्या पत्नीस खावयास द्या" असें सांगितलें. दादोपंत जागे होऊन पहातात तों हातांत खरोखरच पेढा आहे! मग ते ताहराबादेस गेले आणि तो पेढा त्यांनीं आपल्या पत्नीस खावयास दिला. लवकरच ती गर्भवती झाली. ताहराबाद येथें महीपतींचा जन्म सन १७१५ (शके १६३७) त झाला; दादोपंतांची साठी उलटल्यावर त्यांनीं हें पुत्रमुख पाहिलें. महीपति हे ऋग्वेदी वाशिष्ठ गोत्री देशस्थ ब्राह्मण; आडनांव कांबळे. महीपति रूपानें फार सुंदर होते तसे बुद्धीनेंही चलाख होते. त्यांचा बांधा सुदृढ होता. बाळपणचे खेळ म्हणजे भजन पूजन. दगडाच्या चिपळ्या घेऊन ते भजन करीत. ते पांच वर्षांचे झाले तेव्हां त्यांनीं वडिलांपाशीं पंढरपुरास जाण्याचा हट्ट घेतला. वडील अशक्त झाले होते म्हणून त्यांनीं आपल्या विश्वासाचा एक कासार व दोन ब्राह्मण बरोबर देऊन महीपतींस पंढरपुरास पाठविलें. तेथें त्यांनीं श्रीपांडुरंगाचें दर्शन घेतलें व क्षेत्रप्रदक्षिणा केली.

महीपतींचें शिक्षण बरेंच झालें होतें. त्यांनीं स्वहस्तें लिहिलेले ग्रंथ उपलब्ध आहेत त्यांतील त्यांचें हस्ताक्षर चांगलें आहे. 'कथासारामृत' हा आपला ग्रंथ त्यांनीं संस्कृत पुराणग्रंथांच्या आधारानें लिहिला आहे यावरून त्यांना संस्कृत भाषा अवगत असावी हें उघड दिसतें. मात्र, एकनाथ, मुक्तेश्वर, वामन, मोरोपंत यांच्यासारखे ते मोठे व्युत्पन्न पंडित होते असें मानण्यास आधार नाहीं. मराठी तर त्यांची मातृभाषाच होती, पण त्याशिवाय, गुजराथी, हिंदी व

कानडी याही भाषा त्यांस अवगत होत्या. आपल्यापूर्वीं होऊन गेलेल्या ठळक मराठी कवींची कविता त्यांनीं लक्षपूर्वक वाचली होती हें त्यांच्या ग्रंथांवरून दिसतें. महीपति आपल्या वयाच्या १६ व्या वर्षापासून कुळकरणाचें काम करूं लागले. ताहराबादचें कुळकर्ण व जोशीपणा हीं त्यांच्या घराण्याकडे होतीं. ताहराबाद हा गांव एका मुसलमानाचा जहागिरीचा गांव होता. त्याच्या कचेरींत महीपतींस नित्य जावें लागत असे. एके दिवशीं ते कचेरींतून आल्यावर, स्नान करून देवपूजेस बसले असतां जहागिरदाराचा शिपाई त्यांस बोलावण्यास आला. 'देवपूजा आटोपतांच येतों' असें महीपतींनीं त्यास सांगितलें. इतक्यांत आणखी दोन बोलावणीं आलीं. तेव्हां तो यवन शिपाई त्यांस कांहीं उणेअधिक शब्द बोलला. ते ऐकून महीपतींस फार वाईट वाटलें. पूजा आटोपल्यावर ते जहागिरदाराच्या वाड्यांत गेले व तिकडचें काम संपवून घरीं आल्यावर, कानास लेखणी होती ती देवापुढें ठेवून त्यांनीं शपथ वाहिली कीं "आजपासून गांवकामांत लेखणी हातीं धरणार नाहीं." ही शपथ शेवटपर्यंत त्यांनीं पाळली व त्यांचे वंशजही ती पाळीत आले आहेत, व सात पिढ्यांपर्यंत ती तशीच पाळली जावयाची आहे.

महीपतींस विठ्ठलबोवा व नारायणबोवा असे दोन पुत्र होते. पैकीं विठ्ठलबोवा हे गवयी असून दुसऱ्या बाजीरावांचे आश्रित होते; व त्यामुळें ते पुण्यास रहात असत. महीपतींचे वंशज हल्लीं ताहराबाद येथें आहेत, त्याच्यापैकीं कांहीं कीर्तन फार चांगलें करितात. महीपतींचा वंशवृक्ष येणेंप्रमाणें:—



मोरोपंत, अमृतराय, मध्वमुनीश्वर, रामजोशी, मोरोपंत, सोहिरोबा, शिवदिन केसरी, देवनाथ हे सर्व कवि महीपतींचे समकालीन होत; मात्र यांपैकीं कोणाशीं त्यांचा परिचय होता कीं काय, यासंबंधाची माहिती उपलब्ध नाहीं. मोरोपंत महीपतींहून १४ वर्षांनीं लहान होते. महीपतींच्या पत्नीचें नांव काय होतें हें कोठेंही नमूद केलेलें आढळत नाहीं. दादोपंतांचा वृद्धापकाल झाल्यामुळें त्यांची पंढरीची वारी महीपतींनीं पुढें चालविली. पंढरपूर, पांडुरंग आणि वारकरी साधुसंत यांच्या संबंधानें तुकारामबुवांच्या पश्चात्, महीपतींनीं जितकें वाङ्मय लिहिलें तितकें दुसऱ्या कोणी लिहिलें नाहीं. महीपतींची पंढरीची वारी कधीं चुकली नाहीं. त्यांच्या वृद्धापकालीं ते एकदां पंढरपुरास जात असतां घोड्यावरून पडले तेव्हा त्यांच्या इष्टमित्रांनीं त्यांस परत घरीं आणलें, त्या वेळीं त्यांनीं पांडुरंगास एक लहानसें ओवीबद्ध पत्र पाठविलें तें याच लेखांत पुढें दिलें आहे. तुकारामबुवांनीं आपणास स्वप्नांत दृष्टांत देऊन संतचरित्रें गाण्याची आज्ञा केली असें महीपति म्हणतात.

**“ नमूं सद्गुरु तुकाराम। जेणें निरसिला भवभ्रम।**
**आपुले नामीं देऊनि प्रेम। भवबंधन निरसिलें ॥ ३॥**

—भक्तविजय, अध्याय १ ला

**“ ज्यानें मस्तकीं ठेविला अभयकर। दुस्तर भवाब्धि केला पार।**
**तो तुकाराम सद्गुरु वैष्णववीर। ग्रंथारंभीं नमस्कार तयासी ॥**
**मृत्युलोकीं दाविली अघटित करणी। देहासमवेत गेले वैकुंठभुवनीं।**
**अद्यापि शुद्ध भाव देखोनी। देती स्वप्नीं उपदेश ॥**

—संतलीलामृत, अ० १ ला.

या ओव्यांत स्वतः महीपतींनीं जी गोष्ट स्पष्टपणें नमूद केली आहे तिच्या सत्यत्वासंबंधानें शंका घेण्याचें कांहीं कारण आहे असें मला वाटत नाहीं. तुकोबांनीं आपल्या निर्याणानंतर बहिणाबाई, निळोबा व कचेश्वर यांनाही असेच दृष्टांत दिल्याच्या कथा ग्रंथांतरीं वर्णिल्या आहेत. तुकारामबुवांस महीपतीसारखा प्रेमळ शिष्य चांगला शोभतो यांत संशय नाहीं. महीपतींनीं शेंकडों संतांचीं चरित्रें लिहिलीं आहेत, परंतु त्यांनीं लिहिलेल्या तुकारामचरित्राइतकें सुंदर जुनें संतचरित्र मराठी भाषेंत दुसरें नाहीं. महीपतींचा पहिला

संतचरित्राविषयक ग्रंथ भक्तविजय हा शके १६८४ या वर्षी पूर्ण झाला. त्या वेळीं त्यांचें वय ३७ वर्षांचें होतें. अर्थात् त्यापूर्वी थोडे दिवस महीपतींस तुकोबांचा दृष्टांत झाला असावा. तुकारामबुवा हेच आपचे गुरु होत असें महीपतींनीं इतत्रही सांगितलें आहे:—

**सद्गुरु तुकाराम समर्थ। अंतरसाक्ष चैतन्यनाथ।**
**तेणें होवोनि हृदयस्थ। आठव मातें दीधला ॥ १०९ ॥**

—संतलीलामृत, अ. ३५ वा.

**सद्गुरु तुकाराम समर्थ। तयासि माझा प्रणिपात।**
**ज्यानें अवतार घेवोनि मृत्युलोकांत। दाविला भक्तिपंथ साधकां ॥१४॥**

* * * *

**जो भक्तिज्ञानवैराग्य पुतळा। ज्याचे अंगीं अनंत कळा।**
**तो सद्गुरु तुकाराम आम्हांसि जोडला। स्वप्नीं दिधला उपदेश ॥ २० ॥**
**मी तरी सर्वाविषयीं हीन। ऐसें साक्ष देतसे मन।**
**परी कृपा केली कवण्या गुणें। त्याचें कारण तो जाणे ॥ २१ ॥**

—भक्तलीलामृत, अ० १ ला.

महात्मा येशू ख्रिस्त यास क्रुसी देण्यांत आल्यामुळें तो मृत्यु पावला व त्यानंतर तीन दिवसांनीं त्यानें आपल्या आईस व शिष्यांस दर्शन दिलें अशी कथा ख्रिस्ती पुराणांत वर्णिली आहे. आमच्या कांहीं संतांच्या बाबतींतही असाच प्रकार घडला असावा. असो.

महीपतींचा पहिला ग्रंथ भक्तविजय होय हें पूर्वी सांगितलेंच आहे. महीपतीनी लिहिलेली एकंदर कविता येणेंप्रमाणें:—

| ग्रंथ | | पद्यसंख्या | | रचनाकाल | |
|---|---|---|---|---|---|
| १ भक्तविजय, अ. ५७ | ओव्या | ९९१६ | शके | १६८४ |
| २ संतलीलामृत ,, ३५ | ,, | ५३५९ | ,, | १६८९ |
| ३ भक्तलीलामृत ,, ५१ | ,, | १०७९४ | ,, | १६९६ |
| ४ संतविजय ,, २६ | ,, | ४६२८ | ,, | ,, |
| ५ कथासारामृत, अ. ३६ | | ७२०० | | १६८७ |
| ६ पंढरीमाहात्म्य ,, १२ | | | | |
| ७ अनंतव्रतकथा | | १८६ | | |

| | | |
|---|---|---|
| ८ | दत्तात्रेयजन्म | ११२ |
| ९ | तुलसीमाहात्म्य अ० ५ | ७६३ |
| १० | गणेशपुराणाचा कांहीं भाग, अ. ४ | ३०४ |
| ११ | पांडुरंगस्तोत्र | १०८ |
| १२ | मुक्ताभरणव्रत | १०१ |
| १३ | ऋषिपंचमी व्रत | १४२ |
| १४ | अपराधनिवेदनस्तोत्र | १०१ |
| १५ | अभंग व स्फुट पदें | |

या एकंदर ग्रंथाची पद्यसंख्या सुमारें ४०००० होईल.

भक्तविजयांत ज्या संतकथा वर्णन करावयाच्या राहिल्या त्यांचा संग्रह करावा म्हणून महीपतींनीं 'संतलीलामृत' हा दुसरा ग्रंथ लिहिला, हें पुढील ओव्यांवरून दिसतें :—

**आतां कलियुगामाजी निश्चिती । बौद्ध अवतार धरी श्रीपति ।**
**तरी अज्ञानी जन कैसे तरती । मग अवतार संतीं घेतले ॥ ६२ ॥**
**त्यांचें चरित्र यथापद्धती । तें वर्णिलें भक्तविजय ग्रंथीं ।**
**परी ते कदा संपूर्ण न होती । आस्था चित्तीं दुणावे ॥ ६३ ॥**
**असंख्य ईश्वराच्या विभूति । संख्या करितां न पुरेचि मती ।**
**अंगींचे रोम आहेत किती । ते न गणवती सर्वथा ॥ ६४ ॥**
**परी एक सांगतों आपुलें मत । भक्तस्तवनीं रमलें चित्त ।**
**यालागीं संतलीलामृत । दुसरा ग्रंथ आरंभिला ॥ ६५ ॥**
**भक्तविजयांत राहिलीं चरित्रें । तीं येथें ऐकावीं सविस्तर ।**
**बुद्धीचा दाता रुक्मिणीवर । सर्व भार तयावरी ॥ ६६ ॥**

या ओव्यांत भक्तविजयानंतर संतलीलामृत लिहिलें असें स्पष्ट सांगितलें आहे, पण १८८६ सालीं मारुती जनार्दन दांडेकर यांनीं प्रसिद्ध केलेल्या व त्यांच्याच प्रतीवरून पुढील तीन प्रकाशकांनीं छापलेल्या 'संतलीलामृता'च्या अखेरीस ग्रंथसमाप्तिकाल

**शके सोळाशें एकूणऐशीं । सर्वजित नाम संवत्सरासी ।**
**फाल्गुन शुद्ध चतुर्थीसी । ग्रंथ सिद्धीसी पावला ॥**

असा दिला आहे. पण यांतला 'एकोणऐंशी' हा पाठ चुकीचा असून, महीपतींच्या स्वदस्तुरच्या हस्तलिखित प्रतींत 'शके सोळाशें नव्यायशीं' असा पाठ आहे.

संतलीलामृतानंतर महीपतींनीं 'भक्तलीलामृत' हा सर्वांत मोठा संत-कथाग्रंथ लिहिला. त्याच्या पहिल्या अध्यायांत ते लिहितात :—

**त्यांचीं चरित्रें व्हावया प्रख्यात । युक्ति केली पंढरीनाथें ।**
**मज पुढें करूनि निमित्त । श्रीभक्तविजय ग्रंथ वदविला ॥**
**दुसरा संतलीलामृतसार । त्यांतही चरित्रें वर्णिलीं फार ।**
**परी आणिक कथा राहिल्या अपार । मग रुक्मिणीवरें आज्ञापिलें ॥**
**म्हणोनि भक्तलीलामृत जाण । ग्रंथ आरंभिला दुसऱ्यानें ।**

महीपतींचा संतचरित्रविषयक चौथा ग्रंथ 'संतविजय' हा अपूर्ण आहे अशी समजूत आहे. याचे २६ अध्याय असून त्यापैकीं पहिल्या २५ अध्यायांत श्रीसमर्थ रामदासचरित्र विस्तारेंकरून वर्णिलें आहे व २६ व्या अध्यायात बाबाजीबावा अरणगांवकर यांचें चरित्र दिलें आहे. या ग्रंथाचा शेवटचा कलशाध्याय म्हणून १८९ ओव्यांचा एक अध्याय हल्लीं छापला आहे, पण तो इतका अशुद्ध आहे की तो महीपतिकृतच आहे असें मानण्यास मन प्रवृत्त होत नाहीं.

हा 'संतविजय' ग्रंथ महीपतिकृत नसून कोणी तरी रामदाससांप्रदायी गृहस्थानें तो महीपतींच्या नांवावर दडपून दिला असावा अशा अर्थाचा एक लेख प. वा. डॉ. प्रभाकर रामकृष्ण भांडारकर यांनीं 'एक पुण्यकपट' या सदराखालीं 'विविधज्ञानविस्तार' मासिकात पूर्वी प्रसिद्ध केला होता, पण खुद्द महीपतींनींच लिहिलेला 'संतविजय' त्यांच्या वंशजांपाशीं असल्यामुळें, तशी शंका घेण्याचें कांहीं कारण नाहीं. महीपतींनीं स्वहस्तें लिहिलेला हा 'संतविजय' अपूर्ण आहे असें त्यांच्या वंशजांचें म्हणणें आहे व उपलब्ध असलेल्या संतविजयाचे शेवटीं ज्या अर्थी फलश्रुति व ग्रंथसमाप्तिकालनिर्देश नाहीं त्या अर्थी तें म्हणणें खरें असावें असें वाटतें; व यावरून सदर ग्रंथ पूर्ण होण्यापूर्वी महीपति स्वर्गस्थ झाले असावे असेंही वाटतें. पूर्वी भक्तविजयांत रामदासस्वामींचें थोडेंसें चरित्र महीपतींनीं दिलें

होतें; त्यानंतर त्या चरित्राची अधिक माहिती मिळत गेली व इतरांनीं लिहिलेले समर्थचरित्रग्रंथ महीपतींच्या अवलोकनांत आले तेव्हां त्यानी संतविजयांत समर्थचरित्र विस्तारेंकरून वर्णिलें.

कै. वि. का. राजवाडे यांनीं 'सरस्वतीमंदिर' मासिकांत "नाभाजीनें व महीपतीनें वर्णिलेले संत" या सदराखालीं एक उपयुक्त यादी प्रसिद्ध केली आहे तींत त्यांनीं महीपतींच्या ग्रंथांचा जो क्रम दिला आहे त्यांत भक्तविजयानंतर संतविजय झाला असें म्हटलें आहे, पण हें विधान प्रमाणशुद्ध नाहीं हें खुद्द महीपतींनीं दिलेल्या वरील ग्रंथरचनाक्रमावरून उघड दिसतें.

वरील ग्रंथाशिवाय महीपतींनीं 'सारांश ज्ञानेश्वरी' या नांवाचा एक ग्रंथ तयार केला आहे, त्यांत ज्ञानेश्वरीतल्या १४३१ निवडक ओंव्या दिल्या आहेत. ओंव्यांची निवड करताना 'भक्ति' या विषयावर महीपतींनीं विशेष कटाक्ष ठेविला होता असें त्या ओंव्यांवरून दिसतें. हा ग्रंथ पुणें येथील 'चित्रशाळे'नें प्रसिद्ध केला आहे.

महीपति स्वभावानें फार नम्र, प्रेमळ आणि मोठे बहुश्रुत होते. सगुणोपासनेकडेच त्यांचा ओढा विशेष दिसतो. ते कट्टे वैष्णव—तुकारामबुवांचे पूर्ण अनुयायी होते. अहिंसा, भूतदया आणि वसुधैव कुटुंबकत्व हे गुण त्याच्या अंगीं पूर्णत्वानें वास करीत होते. त्याच्या वेळीं महाराष्ट्रांत मोठा दुष्काळ पडला होता त्यास 'करंड्याचें साल' असें म्हणतात. या दुष्काळात महीपतींनीं आपल्या घरावर तुलसीपत्र ठेवून तें गरिबांकडून लुटविलें! ती हकीकत गांवच्या जहागिरदारास (हा मुसलमान होता हें पूर्वी सांगितलेंच आहे) समजतांच त्यानें महीपतींकडे पुष्कळ गाड्या भरून साहित्य पाठविलें, परंतु त्याचा स्वीकार न करितां त्यानीं आपला चरितार्थ भिक्षेवर चालविला. ह्याप्रमाणें दर तीन वर्षांनीं आपलें घर लुटविण्याचा क्रम त्यानीं चालू ठेविला. पुढें लोकांनीं सांगितलें कीं हा आपला क्रम आपल्या पश्चात् चालणें कठिण आहे तरी जें निरंतर चालेल तें करावें. मग महीपतींनी ताहराबाद येथें श्रीविठ्ठलाचें मंदिर अयाचित वृत्तीनें बांधिलें व तेथें आषाढ वद्य १० पासून अमावास्येपर्यंत पांडुरंगाचा उत्सव करण्याची चाल सुरू केली ती अद्याप चालू आहे.

तुकारामबुवानीं स्वप्नात येऊन आपणांस दृष्टांत दिल्याची हकीकत महीपतीनीं आपल्या ओवीबद्ध ग्रंथांत सांगितलीच आहे, पण एका स्वतंत्र अभंगांतही ती सांगितली आहे:—

बाळपणीं मरे माता । मग प्रतिपाळी पिता ॥
तैशापरी संभाळिलें । ब्रीद आपुलें साच केलें ॥
यात्रा नेली पंढरीसी । ध्यान ठेविलें पायासीं ॥
हृदयीं प्रकटोनी बुद्धि । भक्तविजय नेला सिद्धि ॥
स्वप्नीं येउनी तुकाराम । आपुलें सांगितलें नाम ॥
महीपति म्हणे हरी । तुमच्या हातीं सूत्रदोरी ॥

एकदां पंढरपुरास जात असतां महीपति घोड्यावरून पडले व त्यामुळे त्यांना परत घरीं यावें लागलें त्या वेळीं त्यांनीं पांडुरंगास पुढील ओवीबद्ध पत्र पाठविलें:—

जय क्षीराब्धिवासा अनंता । अनंतशायी मायातीता ।
भक्तवत्सल पंढरीनाथा । रुक्मिणीकांता श्रीविठ्ठला ॥
सेवेसि विज्ञापना ऐसी । येत होतों पंढरीसी ।
पांच कोस प्रथम दिवशीं । नांदुरासी पातलों ॥
एक रात्र क्रमोनि तेथ । प्रातःकाळीं उठलों त्वरित ।
अश्वावरूनि अकस्मात । ग्रामद्वारीं पडियेलों ॥
तेणें देहदुःखेंकरून । विकल मूर्च्छित पडिलों जाण ।
चित्तीं झालें तुझें स्मरण । अगाध महिमान संतांचें ॥
इष्टमित्र आप्त व्याहीं । डोली करूनि आणिलें गांवीं ।
चित्तवृत्ति विठाबाई । तुझे पायीं लागली ॥
त्रितापाचे विस्तार किती । पत्रीं ल्याहावे तुजप्रती ।
शरीरीं किंचित् नाहीं शक्ति । लेखणी हातीं धरवेना ॥
अंतरसाक्ष चैतन्यघन । जाणसी जीवाची निजखूण ।
आरुष म्हणोनि तुजकारण । पत्र लिहूनि पाठवूं ॥
शेवटील हेत आहे साचा । संबंध तोडीं या देहाचा ॥
ठाव इच्छितसें पायांचा । आणिक वाचा न बोले ॥
मागें भक्तां पावलासि अंतीं । तें यथार्थ करीं रुक्मिणीपती ॥
विष्णुदास महीपति । सेवेसी विनंति करीतसे ॥

---

× ' निरसिला भवभ्रम ' असाही पाठ आहे.

या १० च ओव्यांवरून महीपतींच्या निरपेक्ष हरिभक्तीची आणि प्रेमळपणाची साक्ष कोणासही पटण्यासारखी आहे. परदेशांत आजारी पडलेल्या मुलानें घरीं आपल्या प्रेमळ पित्यास पत्र लिहावें तसें हें पत्र महीपतींनीं पांडुरंगास लिहिलें आहे. दगडाच्या मूर्तींत जर देवत्व नसेल तर असलें हें अत्यंत करुणरसभरित पत्र ऐकण्यासाठीं तरी तें देवत्व मूर्तींत क्षणभर तरी उत्पन्न झालें असेल यात संशय नाहीं. भक्त भगवंताचे ठायीं किती समरस होऊं शकतात याचा हा सुंदर नमुना आहे. महीपतींनीं आपलें हृदय या पत्रांत साफ उकललें आहे. आणि महीपति देवापाशीं मागतात तरी काय? धनदौलत मागतात काय? आरोग्य मागतात काय? दीर्घायुष्य मागतात काय? नाहीं. तर, " संबंध तोडीं या देहाचा, " " मला मृत्यु येऊं दे " असें मागतात. महीपतींच्या ग्रंथांत सर्वत्र जो इतका प्रेमळपणा वोसंडत आहे तो कोठून आला याचा उलगडा या एका ९ ओव्यांच्या पत्रावरून येतो. गंगाजलनिर्मल अशा हृदयांत प्रेमळपणाशिवाय दुसरें काय असणार?

पायांनीं पंढरपूरची वारी करण्याचें सामर्थ्य, वार्धक्यामुळें, आपल्या अंगीं उरलें नाहीं याबद्दल महीपतीस फार दुःख होत असे. ते म्हणतात:—

## अभंग

**सदां डोळयांपुढें राहो तुझें ध्यान।**
**ऐसी इच्छा पूर्ण वाटे जीवा॥**
**दैवावांचोनियां निष्फळ वासना।**
**ऐसें नारायणा दिसताहे॥**
**तुझे यात्रे गमन घडावें चरणीं।**
**नसे या प्राक्तनीं करूं काय॥**
**आहे जों शरीर घडो परोपकार।**
**असत्य उत्तर न यो वाचे॥**
**महीपति म्हणे दाखवीं ते सोय।**
**जेणें भवभय निवारेल॥**

आमच्या साधुसंतांस " अंतरसाक्ष जो चैतन्यघन परमेश्वर तो जीवाची निजखूण जाणतो, त्याला भेटण्यासाठीं पंढरपुरासारख्या ठिकाणींच गेलें पाहिजे असें नाहीं " हें समजत होतें, पण सगुणभक्तीच त्यांना विशेष प्रिय असल्यामुळें

आपलें ' आरुष 'पत्र पांडुरंगाकडे पाठविण्यास महीपतींस कांहीं हरकत वाटली नाहीं. महीपतींचे गुरु तुकाराममहाराज यांनींही असेंच पांडुरंगास एक अभंग-बद्ध पत्र वारकऱ्यांबरोबर पाठविलें होतें. देवास पत्रें पाठविणें किंवा त्याच्याशीं अन्य प्रकारें सलगी करणें म्हणजे त्याचा अपमान किंवा थट्टा करणें होय असें कित्येकांस वाटतें, पण असल्या अपमानाबद्दल देवानें तुकोबांस किंवा महीपतींस एखादी भयंकर शिक्षा केली होती असा पुरावा ज्या अर्थी उपलब्ध नाहीं, उलट असले सलगी करणारे लोकच देवास विशेष प्रिय झाले होते असें दिसतें, त्या अर्थी देवाच्या मानापमानाबद्दल आपणास काळजी करण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं.

महीपति शके १७१२ ( इ. स. १७९० ) श्रावण वद्य १९ या दिवशीं दिवंगत झाले. त्या वेळीं त्यांचें वय ७५ वर्षांचें होतें.

महाराष्ट्र कविवर्य मोरोपंत यांनीं महीपतींचे ग्रंथ वाचले होते, परंतु त्या उभयतांची भेट कधीं झाली होती कीं नाहीं, त्यांचा परस्पर पत्रव्यवहार होता कीं काय, हें समजण्यास कांहीं मार्ग नाहीं. महीपतींचे पुत्र विठोबा गोसावी यांचीं पंतांस गेलेलीं कांहीं पत्रें उपलब्ध झाली आहेत त्यांवरून पंत व विठोबा याचा स्नेहसंबंध होता हें मात्र उघड दिसतें. हे विठोबा गोसावी पंढरपुरास बाबा पाध्ये यांजकडे विद्याभ्यासासाठीं राहिले होते. बाबांनींच त्यांची शिफारस मोरोपंतांकडे करून त्यांचा परिचय करून दिला. बाबा पंतांस एका पत्रांत लिहितातः—" हरिदास राजेश्री विठोबा गोसावी ताहराबादकर यांहीं आपणास पुस्तकाविषयीं लिहिलें. आपण ग्रंथ पाठवून द्यावे. ते प्रति करून आपणास शीघ्र परत करतील. " यापुढें पंत व विठोबा गोसावी यांचा स्नेहसंबंध जडला व तो उत्तरोत्तर दृढ होत गेला पंतांनीं आपल्या ' सन्मणि-मालें'त महीपतींचा उल्लेख केलेला नाहीं. पुढें विठोबा गोसावी ताहराबादकर यांच्या सूचनेवरून त्यांनीं ' महीपतिस्तुति ' या नांवाचें एक लहानसें प्रकरण लिहिलें ते येथें देतोंः—

## आर्या

**श्रीहरिभक्तजनांचीं श्रीहरिभक्तिरससत्सुधाभरितें**
**चरितें गातां जेणें आयुष्य क्षण पडों दिलें न रितें ॥ १ ॥**
**हरिभक्तविजय नामें रचिला सद्ग्रंथ दोष साराया।**
**वाराया तापातें प्राणी भवसागरांत ताराया ॥ २ ॥**

त्या महिपतितें पाहुनि ऐकुनि सच्चित्त कां न लोभावें ।
शोभावें यश ज्याचें चिर नामिला विष्णुदास तो भावें ॥ ३ ॥
ज्याचा ग्रंथ हरिजनां सेव्य चकोरां जसा सदा इंदु ।
जो पसरला जगांत स्नेहाचा सत्सरीं जसा बिंदु ॥ ४ ॥
सत्य तुकारामाचा या महिपतिवरि वरप्रसाद असे ।
सदनुग्रहाविणें हे निघतिल उद्गार सार काय असे ॥ ५ ॥
साधूंचें यश गाया येणें देऊनियां सुभा केला ।
निःसंशय ताराया जड महिपति विठ्ठलें उभा केला ॥ ६ ॥
महिपतिच्या वाणीतें सेवुनि तरतात जेंवि गंगेतें ।
विषयांत रंगलें जें जनमानस सद्यशींच रंगे तें ॥ ७ ॥
ज्ञानोबाची जैशी एकोबाची जशी सुधा वाणी ।
कीं मुक्तेश्वर कविची महिपतिची सेविती तशी प्राणी ॥ ८
महिपतिचा सुत विठ्ठल त्याला श्रीपांडुरंग आठव दे ।
तत्प्रेरणेंकरुनियां आर्या आर्यादरार्थ आठ वदे ॥ ९ ॥
*स्वस्तुति केली म्हणवुनि महिपति हरिभक्त न विटोबा ।
मज तों वाटे ऐसा साधुजनांहूनि अन्य न विठोबा ॥ १० ॥
संतांसि नावडे स्तुति हें ठावें मज परंतु देवास ।
महिपति म्हणेल ‘ विठ्ठलराया, या निजपदींच दे वास ॥ ११ ॥
श्रीविठ्ठलासि आहे साधूंची फार सर्वदा भीड ।
चीड प्रभुसि न येइल देइल मज करुनि निजपदीं नीड ॥ १२ ॥
अंजलि करूनि असतो गरुड उभा जेंवि अहिपतिसमोर ।
हरिभक्तिप्रेमगुणें नम्र सदा तेंवि महिपतिस मोर ॥ १३ ॥

या आर्यांवरून महिपतींच्या योग्यतेविषयीं पंतांच्या मनांत केवढा आदरभाव होता हें स्पष्ट दिसतें. वरील तिसऱ्या आर्येंत “ त्या महिपतितें पाहुनी ” असे शब्द आहेत त्यांवरून पंतांनीं महीपतींस पाहिलें होतें हेंही उघड दिसतें. वरील आर्यांत फक्त ‘ भक्तविजय ’ ग्रंथाचा उल्लेख आहे, महीपतिकृत इतर ग्रंथांचा नाहीं, यावरून व “ स्वतःची स्तुति केली म्हणून महीपतींस विषाद न वाटो ” अशा अर्थाच्या पंतांच्या उद्गारांवरून महीपतींच्या हयातींतच पंतांनीं या

* या चरणांत तीन मात्रांचा एक शब्द कमी आहे.

आर्या रचिल्या असाव्या यांत संशय नाहीं. भक्तविजय ग्रंथ लिहून होतांच तो सगळ्या महाराष्ट्रांत कसा पसरला हें " जो पसरला जगांत स्नेहाचा सत्सरीं जसा बिंदु " या आर्यार्धांत पंतांनीं सांगितलें आहे.

राजाराम प्रासादीकृत भक्तमंजरीमाला, अर्वाचीन भक्तलीलामृत, कै० द. अ. आपटे ( कवि अनंततनय ) कृत कविचरित्र, नवनीत, चरित्रकोश, ज्ञानकोश, व महाराष्ट्र सारस्वत इतक्या ग्रंथांत महीपतींची थोडीबहुत माहिती दिलेली आढळते. मी माझ्या महाराष्टकविचरित्राच्या दुसऱ्या भागात, माहिपतींचें विश्वसनीय चरित्र विस्तारपूर्वक दिलें असून त्याच्याच आधारानें प्रस्तुत लेख लिहिला आहे. असो.

महीपतींच्या चरित्रासंबंधाची बहुतेक महत्त्वाची माहिती येथपर्यंत दिली. महीपतराव व नरहरि महीपति या नांवाचे आणखी दोन महीपति महाराष्ट्रांत होऊन गेले आहेत व त्यांपैकीं नरहरि महीपति बरेच प्रसिद्ध आहेत. ' काव्य-संग्रह ' मासिकांत महीपतींचीं म्हणून जी पदें प्रसिद्ध झालीं आहेत तीं बहुतेक सर्व या नरहरि महीपतींचींच होत.

महीपतींनीं आपले ग्रंथ फार शोधपूर्वक लिहिले आहेत. तत्कालीन परि-स्थित्यनुसार जें संशोधन करणें अवश्य होतें तें करण्यांत त्यांनीं बिलकुल कसूर केलेली नाहीं. त्यांच्यापूर्वी कांहीं लेखकांनीं संतचरित्रें लिहिलीं होतीं, त्यांचा उपयोग तर त्यांनीं केलाच, परंतु स्वतः पुष्कळच नवीन माहिती मिळवून तिच्या आधारानें बहुतेक सर्व संतांचीं चरित्रें त्यांनीं विस्तारपूर्वक लिहिलीं. महाराष्ट्रावर हे त्यांचे मोठे उपकार आहेत. महीपतींनीं ही एवढी मोठी ग्रंथ-रचना केवळ विषयाची आवड म्हणून किंवा आवडीचा विषय म्हणून, निरपेक्षबुद्धीनें केली. ऐतिहासिक चरित्रग्रंथ लिहिण्यासाठीं जो शोध आणि खटाटोप करणें अवश्य आहे तो सगळा त्यांनीं केला होता. पुष्कळ संतांच्या गांवीं जाऊन, त्यांच्या वंशजांस भेटून, त्यांच्या घरची दप्तरें व पोथ्या पाहून, दंतकथा व आख्यायिका ऐकून जी माहिती उपलब्ध झाली तिचा समावेश त्यांनीं आपल्या ग्रंथांत केला आहे. पाश्चात्य वाङ्मयाच्या परिचयामुळें जी एक प्रकारची ऐतिहासिक दृष्टि हल्लीं आपणांस प्राप्त झाली आहे असें आपण समजतों ती महीपतींच्या अंगीं अल्पांशानें तरी होती असें मानण्यास त्यांच्या ग्रंथांत पुष्कळ पुरावा आहे. चमत्कारादि गोष्टी त्यांनीं आपल्या ग्रंथांत दिल्या

आहेत, इतक्याचमुळें त्यांच्या ग्रंथांची योग्यता बिलकुल कमी होत नाहीं. चमत्कारांवर विश्वास ठेवण्याचा तो काल होता इतकेंच नव्हे तर खुद्द महीपतींनीं निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या प्रकारचे पाचदहा चमत्कार केले होते अशीही प्रसिद्धि आहे. अशा स्थितींत त्यानीं, इतर साधूंनीं केलेल्या अलौकिक चमत्काराच्या ज्या गोष्टी ऐकल्या त्या आपल्या ग्रंथात नमूद कराव्या यात कांहीं आश्चर्य नाहीं. शिवाय, अलौकिक चमत्कारांच्या सर्वच कथा झूट असेंही मानण्याचें कारण नाहीं. कारण हा शास्त्रीय विषय आहे. ज्या योगशास्त्राच्या जोरावर असले अलौकिक चमत्कार करून दाखविले जातात तेंदेखील एक शास्त्रच आहे. अर्थात् यांत अशास्त्रीय असें कांहीं नाहीं. मात्र अतिशयोक्ति असेल तर ती केव्हांही त्याज्यच आहे. असो.

महीपतींची वाणी फार रसाळ, प्रासादिक आणि साधी आहे. भाषा सोपी. जुने कठिण शब्द तींत फारसे नाहींत. दीडशें वर्षांपूर्वीच्या खेडवळ देशस्थ ब्राह्मणाच्या भाषेचा तो नमुना आहे. व्याकरणदृष्ट्या महीपतींची वाक्यरचना पुष्कळ ठिकाणीं सदोष आहे, परंतु भाषाशुद्धीकडे बहुतेक जुन्या कवींनीं अमळ दुर्लक्षच केलेलें असल्यामुळें एकट्या महीपतींसच दोष देण्यांत अर्थ नाहीं. मुक्तेश्वरांची प्रतिभा महीपतींत नाही, वामनाची विद्वत्ता नाही, पंतांचें भाषाप्रभुत्व नाहीं, किंवा श्रीधराची रसोत्कटता नाहीं, परंतु प्रेमळपणाच्या बाबतींत मात्र महीपतींचा हात धरणारा दुसरा मराठी कवि नाहीं. ज्ञानदेव, तुकाराम, एकनाथ आणि रामदास यांची महीपतींशीं तुलना करणें अयोग्य होईल. महीपतींच्या ग्रंथांत भक्तिरस नुसता उचंबळून राहिला आहे. ज्ञानदेवांप्रमाणें उपमा व दृष्टांत देण्याची महीपतींस फार हौस दिसते व त्यांच्या उपमादृष्टांतापैकीं कांहीं उपमा व दृष्टांत फार समर्पक आणि सुंदर आहेत यांत संशय नाहीं; परंतु कोठें कोठें त्यांचा अतिरेक झालेला आहे हेंही नमूद केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. महीपतींच्या या भोळ्याभाबड्या बालबोध ग्रंथांनीं महाराष्ट्रांत फार मोठें धर्मकार्य केलें आहे. संतचरित्रें हा महीपतींचा अगदीं आवडता विषय. संतचरित्रवर्णनपर चार मोठे ओवीबद्ध ग्रंथ लिहून त्यांचे समाधान झालें नाहीं म्हणून अभंगवृत्तांत त्यांनीं कांहीं संतचरित्रें पुनः गायिलीं आहेत त्यांची यादी येथें देतों:—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| नामदेवचरित्र | अभंग | ६२ | जगमित्र नागाचरित्र | ,, | ६३ |
| हरिपाळचरित्र | ,, | ५८ | माणकोजी बोधलेचरित्र | ,, | ६७ |
| कमालचरित्र | ,, | ६७ | संतोबा पवारचरित्र | ,, | १०२ |
| नरसिंह मेहताचरित्र | ,, | ५२ | चोखामेळाचरित्र | ,, | ४७ |
| राका कुंभारचरित्र | ,, | ४७ | | | |

महीपतींच्या ओव्यांप्रमाणेंच त्यांचीं पदें व अभंग फार सुरस आहेत. त्यांनीं चार चरणी करुणापर अभंग लिहिले आहेत ते, आरत्या, पदें, इतर फुटकळ अभंग, गणेशचरित्र, कांहीं फुटकळ ओवीबद्ध प्रकरणें, व वरील अभंगबद्ध संतचरित्रें इतकी त्यांची कविता अद्याप अप्रकाशित आहे. आपल्या बहुतेक मोठया ग्रंथाच्या अखेरीस त्या ग्रंथांतील प्रत्येक अध्यायांत कोणता कथाभाग आला आहे याची अनुक्रमणिका महीपतींनीं दिली असून ती त्यांच्या सशास्त्र ग्रंथरचनापद्धतीची निदर्शक आहे.

आपण जें काय लिहीत आहोंत तें पांडुरंगाच्या कृपेनें आणि तुकाराम-बुवांच्या प्रेरणेनें लिहीत आहोंत असा महीपतींचा ठाम समज होता, त्यामुळें, स्वतःच्या कर्तबगारीसंबंधानें ज्यांत थोडासाही अहंभाव व्यक्त झाला आहे असा एक शब्दही त्यांच्या कवितेंत आढळत नाहीं.

कै. वि. ल. भावे यांनीं लिहिलेल्या 'महाराष्ट्र सारस्वत' ग्रंथांत महीपतीं-विषयींची आणखी कांहीं माहिती मिळाली तिचाही येथें संग्रह करितों.

महीपतींस लहानपणापासून धर्माचे व विद्येचे बाबतींत मोरोबा तांभेर-कर नामक एका गृहस्थाश्रमी सत्पुरुषाची शिक्षा असे. महीपतिबाबांस श्रीमंत पंतप्रधान पेशवे यांजकडून व त्याच्या सरदारांकडून कांहीं जमिनी इनाम मिळाल्या होत्या. त्यांच्या सनदा त्यांच्या वंशजांपाशीं आहेत. ह्या सनदा शके १७१० नंतरच्या म्हणजे बाबांची विशेष प्रसिद्धि झाल्यानंतरच्या आहेत. हल्लीं हीं इनामें चालू नाहींत.

—:०:—

# श्रीएकनाथचरित्र

श्रीगणेशाय नमः ।। श्रीदेवकीनंदनाय नमः ।। ऐका श्रोते हो कथा रसिक ।। ऐकतां निवारी भवरोगदुःख ।। अंतरीं ठसावे पूर्णविवेक ।। निजशांतिसुख ये हाता ।। १ ।। कांहीं न करितां योगसाधन ।। न घडतांचि तीर्थाटन ।। भक्तकथा ऐकतां मन लावून ।। वैकुंठभुवन पावती ।। २ ।। जरी बहुत नसली शास्त्रव्युत्पत्ती ।। अंगासी न येतां वैराग्यस्थिती ।। परी हरिकीर्तनीं लावितां प्रीती ।। ते पावन होती क्षणमात्रें ।। ३ ।। जयांसी न घडे व्रतनेम ।। रसनाविषय नव्हेचि शम ।। तिंहीं वाचेसी स्मरतां रामनाम ।। स्वयें पुरुषोत्तम ते होती ।। ४ ।। अंगीं जयांसी कृपणता ।। आणि कुटुंबीं वाढली विशेष ममता ।। तिंहीं श्रवण करितांचि भक्तकथा ।। अनुताप चित्ता ठसावे ।। ५ ।। जैसा लोहदंड होता मळकट ।। परी परिस लागतां तत्काळ पालट ।। तेवीं भक्तकथेची लागतां चट ।। विवेकभेट अज्ञाना ।। ६ ।। जरी पूर्वपुण्याची असेल कोडी ।। तरीच ये कथेची लागेल गोडी ।। इतर प्राक्तनहीन जीं बापुडीं ।। तीं विकल्पें नाडलीं सर्वस्वें ।। ७ ।। म्हणोन तुम्ही भाविक प्रेमळ ।। मज दिसतां दैवाआगळ ।। जे सात्त्विक कथेचे गराळ ।। सेवितां सकळ निजप्रेमें ।। ८ ।। मागील अध्यायीं कथा निगुतीं ।। परमपावन परिसिली श्रोतीं ।। जे भानुदासें पांडुरंगमूर्ती ।। पंढरीसी मागुती आणिली ।। ९ ।। त्या भानुदासाचा पुत्र सद्गुणी ।। त्याचें नाम ठेविलें चक्रपाणी ।। तो परम भाविक वैष्णव ज्ञानी ।। श्रीहरिभजनीं निमग्न ।। १० ।। त्याचा पुत्र सूर्यनारायण ।। जो ज्ञानप्रकाशें देदीप्यमान ।। त्याची कांता सुलक्षण ।। नाम रुक्मीण तियेचें ।। ११ ।। तिचे उदरीं जन्मला सुत ।। नाम त्याचें एकनाथ ।। जो जगद्गुरु

अवतरला साक्षात ॥ परिसा चरित्र तयाचें ॥ १२ ॥ तो दिवसेंदिवस जाहला थोर ॥ व्रतबंध केला सत्वर ॥ मायबापें तयावर ॥ कृपा अपार करिताती ॥ १३ ॥ तेथें जनार्दनपंत ज्ञानराशी ॥ दत्तात्रेयदर्शन होत त्यासी ॥ एकनाथ उठोनि एके दिवसीं ॥ गेला दर्शनासी तयाच्या ॥ १४ ॥ आंगडें टाकूनि मस्तकावरी ॥ सद्भावें त्यास नमस्कारी ॥ जनार्दन देखोनि ते अवसरीं ॥ विस्मित अंतरीं होतसे ॥ १५ ॥ म्हणे तूं कवणाचा सांग त्वरित ॥ कशास्तव आलासी येथ ॥ जनार्दन संबोखोनि तयाप्रत ॥ वृत्तांत पुसत तेधवां ॥ १६ ॥ टाकूनि मातापितयांसीं ॥ रुसोनि आलासी आम्हांपासीं ॥ हें यथार्थ सांगावें मजसीं ॥ संकोच मानसीं न धरितां ॥ १७ ॥ मग जोडूनियां दोन्ही कर ॥ एकनाथ बोले मधुरोत्तर ॥ म्हणे मी ऋग्वेदी ब्राह्मणकुमार ॥ दर्शना साचार पातलों ॥ १८ ॥ मायबापांवरी न रुसतां ॥ उगाच अनुताप वाटला चित्ता ॥ कीं देहीं जडली प्रपंचममता ॥ कामक्रोधें चित्ता गांजिलें ॥ १९ ॥ लोभ माया दंभ अहंकार ॥ हे देहीं दिसती अनिवार ॥ मग स्वामींच्या दर्शनासी सत्वर ॥ आलों साचार निजप्रेमें ॥ २० ॥ आतां हेंचि इच्छा असे मानसीं ॥ कीं निरंतर रहावें तुम्हांपासीं ॥ सेवा करावी अहर्निशीं ॥ निजभावेंसीं आवडीं ॥ २१ ॥ मी पतित शरण आलों पाहें ॥ अंगिकार करीं सद्गुरुमाये ॥ ऐसें बोलोनि लवलाहें ॥ धरिले पाये सद्भावें ॥ २२ ॥ एकनाथाचें ऐकूनियां वचन ॥ आश्चर्य करिती जनार्दन ॥ म्हणे वय तों दिसतें लहान ॥ परी विशाल ज्ञान अनुपम ॥ २३ ॥ मग जनार्दनें अभय देऊनि त्यासी ॥ म्हणे सुखें असावें आम्हांपासीं ॥ हें वचन ऐकूनि मानसीं ॥ उल्हास चित्तासी वाटला ॥ २४ ॥ जैसा द्वैपायन पडतां संशयवनीं ॥ तयासी भेटले नारदमुनी ॥ तेवीं जनार्दनाच्या अभयवचनीं ॥ एकनाथ

मनीं संतोषला ॥ २५ ॥ कीं हंसरूप भेटतां नारायण ॥ विरिंचीस वाटलें समाधान ॥ तेवीं जनार्दनाचे अभयेंकरून ॥ एकनाथ मनीं संतोषला ॥ २६ ॥ स्वामिसेवेसी निरंतर ॥ अहोरात्र असे तत्पर ॥ कोणेविषयीं न पडेचि अंतर ॥ भावार्थ थोर धरियेला ॥ २७ ॥ रात्रीं निजतां जनार्दन ॥ स्वकरें चुरीत बैसे चरण ॥ निद्रा लागतां त्याजकारण ॥ परी न उठणें सर्वथा ॥ २८ ॥ विडा करूनि निजहस्तें ॥ सर्व साहित्य मिळवून त्यांत ॥ जनार्दनासी होऊन विनीत ॥ घाली मुखांत निजप्रेमें ॥ २९ ॥ मुख प्रक्षाळावयासी तस्त ॥ निजकरें पुढें आणोनि ठेवीत ॥ स्नान घालूनियां आपुले हस्तें ॥ साहित्य देत पूजेचें ॥ ३० ॥ गंधाक्षता सुमन चंदन ॥ धूपदीपादि उपचार जाण ॥ जेव्हां जें मागती जनार्दन ॥ तें सत्वर आणून देतसे ॥ ३१ ॥ जेवितां शेष उच्छिष्ट राहात ॥ तें निजप्रीतीं भक्षी एकनाथ ॥ ऐसी सेवा दिवस बहुत ॥ असे करीत निजप्रेमें ॥ ३२ ॥ .... .... .... .... .... ॥ ३३ ॥ बहिर्भूमीचें जें स्थळ ॥ तें स्वहस्तें करी अति निर्मळ ॥ ऐसा गुरुभक्तीसी सर्वकाळ ॥ एकनाथ केवळ विनटला ॥ ३४ ॥ हें जनार्दनें दृष्टीं देखतां ॥ मग आश्चर्य करी निजचित्ता ॥ म्हणे मनुष्य म्हणूं नये एकनाथा ॥ सकळ गुरुभक्तां वरिष्ठ कीं ॥ ३५ ॥ एकांत पाहोनि एके दिवसीं ॥ जनार्दन कृपेनें पुसती त्यासी ॥ तूं सेवा करितोसी आम्हांपासीं ॥ मायबापांसी न कळतां ॥ ३६ ॥ तुम्ही तंव विरक्त दिसतां जाण ॥ घरीं पाहिजे वस्त्र अन्न ॥ वडील वृद्ध दोघें जण ॥ चिंता दारुण करितील ॥ ३७ ॥ ऐसें जाणूनि जनार्दन ॥ घरीं पाठवीत वस्त्र अन्न ॥ वडिलांसी कळतां वर्तमान ॥ समाधान वाटलें ॥ ३८ ॥ जनार्दन विचारी निजअंतरीं ॥ म्हणे यासी सांगावी कांहीं चाकरी ॥ मग एकनाथासी आज्ञा करी ॥

हिशेब दप्तरीं राखावा ॥ ३९ ॥ तूं तेथें असलासी जरी प्रवीण ॥ तरी कळों येईल अवघेंच ज्ञान ॥ मग अवश्य म्हणोनि केलें नमन ॥ म्हणे आज्ञा प्रमाण स्वामींची ॥ ४० ॥ परी सेवेसी न पडतां अंतर ॥ हिशेब राखावा निरंतर ॥ जनार्दन म्हणती परम चतुर ॥ कळला विचार मजलागीं ॥ ४१ ॥ तरी कांहीं निमित्त करून जाण ॥ स्वरूपीं लावावें याचें मन ॥ एकनाथास जवळी बोलावून ॥ म्हणे हिशेब दाखवणें आम्हांसी ॥ ४२ ॥ पाहूनि खरडा खतावणी ॥ हिशेब दाखवीं आम्हां-लागूनी ॥ अवश्य म्हणोनि तये क्षणीं ॥ पुढती चरणीं लागला ॥ ४३ ॥ सेवेचा सारूनि नित्यनेम जाण ॥ रात्रीं दीपकासी घातलें भरण ॥ त्यांत एक अडका राहिला चुकोन ॥ तोचि धुंडोनि पाहातसे ॥ ४४ ॥ परि कोठेंचि न सांपडे त्वरित ॥ ताळा न पडेचि हिशेबांत ॥ मग एकाग्र करून चित्त ॥ हिशेब पहात बैसला ॥ ४५ ॥ क्षणभरीही न करी शयन ॥ न मानी निजदेहाचा शीण ॥ तृषा लागली अति-दारुण ॥ परी उदकपान करीना ॥ ४६ ॥ म्हणे उपाहार करूनि उदक प्राशितां ॥ तरी निद्रा आळस येईल तत्त्वतां ॥ मग काय सांगावें गुरुनाथा ॥ विवेक चित्ता करीतसे ॥ ४७ ॥ जनार्दन जागृत होऊनि त्वरित ॥ सभोंवतें विलोकूनि जंव पाहात ॥ तों एकनाथ न दिसे तेथ ॥ म्हणोनि विस्मित जाहले ॥ ४८ ॥ अंतर्गृहीं धुंडितां देखा ॥ तों हिशेब पाहत बैसला एका ॥ भरण घालोनि दीपका ॥ धुंडीत अडका निश्चलत्वें ॥ ४९ ॥ तों अकस्मात ताळा पडतां ॥ हर्ष वाटला एकनाथा ॥ मग आपुल्याच हातें टाळी पिटित ॥ दुसरा नसतां सन्निध ॥ ५० ॥ मागें उभे राहून तेथ ॥ जनार्दन पाहती कौतुकांत ॥ मग सम्मुख येऊनि त्वरित ॥ स्वमुखें पुसत तयासी ॥ ५१ ॥ सद्गुरु म्हणती एक-नाथा ॥ काय आश्चर्य वाटलें चित्ता ॥ म्हणोनि हर्ष मानूनि आतां ॥

हांसलासी ये क्षणीं ॥ ५२ ॥ ऐसें ऐकोनियां वचन ॥ वरतें पाहे विलोकून ॥ मग सत्वर उभा राहून ॥ केलें नमन सद्भावें ॥ ५३ ॥ म्हणे सर्व हिशेब शोधून पाहतां ॥ त्यांत एक अडका चुकला होता ॥ त्याचा अकस्मात ताळा पडतां ॥ उल्हास चित्ता वाटला ॥ ५४ ॥ म्हणोनि संतोष पावून मन ॥ हांसें आलें मजकारण ॥ ऐसें ऐकोनियां वचन ॥ जनार्दन झाले विस्मित ॥ ५५ ॥ मग एकनाथासी सद्गुरु बोलत ॥ तुझें अडक्याकडे लागलें चित्त ॥ तैसें श्रीकृष्णचरणीं होतां रत ॥ तरी पावशील निजहित आपुलें ॥ ५६ ॥ ऐसीं अक्षरें पडतां कानीं ॥ अनुताप जाहला तये क्षणीं ॥ म्हणे हेचि इच्छा होती मनीं ॥ जे आज्ञा स्वामींनीं मज द्यावी ॥ ५७ ॥ धन्य दिवस सुदिन आजिचा ॥ अनुग्रह जाहला निजकृपेचा ॥ विकार तुटोनि मायेचा ॥ ठाव प्रपंचाचा पुसिला ॥ ५८ ॥ मग लेखणी घेऊनि तये क्षणीं ॥ एकनाथें ठेविली सद्गुरुचरणीं ॥ सांगितली जमाखर्चघडणी ॥ ते ऐकावी सज्जनीं निजप्रीतीं ॥ ५९ ॥ नरदेह मुद्दल सालमजकुर ॥ गुदस्तां रुजू पूर्वसंस्कार ॥ प्रेमपत्र हृदयीं अक्षर ॥ स्वधर्म थोर खर्च केला ॥ ६० ॥ फळत्याग करितांचि सकळ ॥ रुजू पावेल स्वामींजवळ ॥ ब्रह्मार्पणीं तये वेळ ॥ अर्पिलें न कळे सर्वथा ॥ ६१ ॥ विचार सुरस हा निजनेमाचा ॥ सावधानपणीं लिहितां साचा ॥ वरी मनसुर सद्गुरुकृपेचा ॥ हिशेब सकळाचा पुसिला ॥ ६२ ॥ एवं नरदेहजमा झाडियासी आणूनी ॥ अज्ञानबाकी झाडा करूनी ॥ मी विनटलों तुमचे चरणीं ॥ व्यापार सांडोनि निजछंदें ॥ ६३ ॥ त्रैलोक्याचे स्वामी आपण ॥ व्यापार जाहला तुम्हांपासून ॥ ते वाचेसी आवडे कृष्णनाम ॥ कृपेकरून आपुल्या ॥ ६४ ॥ सोहं दिधलें खुर्द खत ॥ तें मस्तकीं वंदिलें म्यां त्वरित ॥ प्रेमाचीं वस्त्रें अपरिमित ॥ पावलों निश्चित ये काळीं ॥ ६५ ॥

तंव व्यवसायी बोले त्यांकारण ॥ चाऱ्ही प्रहर रात्रीं जागरण ॥ ऐसें एक मासपर्यंत जाण ॥ होतसे कीर्तन तुकयाचें ॥ ७२ ॥ ऐसी ऐकोनियां मात ॥ हरिदास जाहले चिंताक्रांत ॥ म्हणती आपण लोहोगांवांत ॥ आतां न जावें सर्वथा ॥ ७३ ॥ जेथें प्रेमळाचें कीर्तन होत ॥ तरी आपुलें कसब न रुचे तेथ ॥ जेवीं रोगियास लाधलें दिव्यामृत ॥ तो न घे औषध कल्पांतीं ॥ ७४ ॥ अमूल्या हिरियांची दीप्ती ॥ काचमणी लोपोनि जाती ॥ नातरी उदयासी येतां गभस्ती ॥ दीपक हरपती त्यापुढें ॥ ७५ ॥ समीप गंगा वाहतां जाण ॥ तेथें मग वापीकूपांस पुसे कोण ॥ तेवीं प्रासादिकांचें ऐकतां कीर्तन ॥ धीटपाठ गायन रुचेना ॥ ७६ ॥ तरी लोहोगांव डावलोनियां पुढारीं ॥ आतां चलावें आणिका नगरा ॥ ऐसें बोलोनियां येरयेरां ॥ हरिदास सत्वरां परतले ॥ ७७ ॥ गांवींचे लोक होते तेथ ॥ ते सत्वर येऊनि नगरांत ॥ तुकयासी सांगती वृत्तांत ॥ जो देखिला निज दृष्टी ॥ ७८ ॥ ऐसें ऐकतांचि वचन ॥ तेथोन उठिला न लागतां क्षण ॥ म्हणे आपण सामोरा जाऊन ॥ आणावे प्रार्थून हरिदासां ॥ ७९ ॥ आपण सवेग चालत ॥ अंतरीं उल्हास वाटे बहुत ॥ ग्रामवासी लोक समस्त ॥ तेही चालती सामोरे ॥ १८० ॥ म्हणती पंढरी क्षेत्रीं हरिदास ॥ चालिले होऊनि उदास ॥ तरी आपण प्रार्थूनियां तयांस ॥ आणावें नगरास आपुल्या ॥ ८१ ॥ मग पुढें धांवणार पाठवूनी ॥ परतविलें तयांलागोनी ॥ म्हणती वैष्णव तुका आवडीकरूनी ॥ भेटावयास येतसे ॥ ८२ ॥ इतुका निरोप सांगतां जाण ॥ तंव तेही पावले न लागतां क्षण ॥ मग हरिदासांसी करूनि नमन ॥ देऊनि आलिंगन भेटले ॥ ८३ ॥ तुकयास म्हणती क्षेत्रवासी ॥ आम्हीं पातलों देशावरासी ॥ कीं घरी लग्न वैशाखमासीं ॥ करणें असे पुत्राचें ॥ ८४ ॥ अवश्य म्हणोनि

ते वेळे ॥ गांवांत हरिदासांसी आणिलें ॥ राहावयासी देऊनि स्थळ चांगलें ॥ शिधासाहित्य पाठविलें ॥ ८५ ॥ मग करूनियां भोजन ॥ रात्रीं करिती हरिकीर्तन ॥ एकमासपर्यंत जाण ॥ होतसे आनंद या रीतीं ॥ ८६ ॥ मग ग्रामवासियां भाविक लोकां ॥ आज्ञा करी वैष्णव तुका ॥ आतां देशावर करूनि देखा ॥ हरिदासां वाटे लावावें ॥ ८७ ॥ ब्राह्मणांचे कष्ट घेऊन ॥ मग त्यांसी द्यावें द्रव्यदान ॥ हें तुम्हांसी वाटतें भूषण ॥ परी पदरीं पुण्य पडेना ॥ ८८ ॥ तरी नगरांत आहेत वस्तीकर ॥ नांदताती लहान थोर ॥ त्यांची शक्ति पाहूनि साचार ॥ मागा देशावर सकळांसी ॥ ८९ ॥ ऐकोनि तुकयाची वाणी ॥ अवश्य म्हणती तये क्षणीं ॥ मग लेखणी पत्र आणोनी ॥ असाम्या मांडोन दीधल्या ॥ १९० ॥ उत्तम मध्यम कनिष्ठ जाण ॥ नगरांत नांदत असती जन ॥ ते म्हणती तुकयालागोन ॥ पत्रीं अंक घालावा ॥ ९१ ॥ मग उत्तमावरी घालूनि तूळ ॥ टाळी लिहिली मध्यमावर ॥ कनिष्ठावरी पकार ॥ लिहिला सत्वर ते समयीं ॥ ९२ ॥ तें देखोनी ग्रामवासी ॥ म्हणती हें न ये आमुचे चित्तासी ॥ मग तुका उत्तर देत तयांसी ॥ जें येईल चित्तासी तें करा ॥ ९३ ॥ त्यांनीं उल्हास धरून अंतरीं ॥ मुळु लिहिलें उत्तमावरी ॥ उदाणूकें आंख झडकरी ॥ मध्यमावरी टाकिला ॥ ९४ ॥ पकार होता कनिष्ठावरी ॥ एक आंख घातला त्यावरी ॥ तुकयास दाऊनि सत्वरीं ॥ गांवकरी ऊठले ॥ ९५ ॥ गांवांत जाऊनि सत्वर ॥ उकलोनि आणिलें देशावर ॥ मुख्य जे म्हणवीत होते थोर ॥ ते तुकयासी उत्तर बोलती ॥ ९६ ॥ पुढें ठेवूनि द्रव्यराशी ॥ म्हणती आम्हीं युक्त केली कैसी ॥ आतां देशावर हरिदासांसी ॥ आपुले हातीं समर्पा ॥ ९७ ॥ ऐसें बोलतां ते अवसरीं ॥ तुकयासी कळों आलें अंतरीं ॥

कीं दातियांच्या चित्तांतरीं ॥ अहंकार वैरी प्रकटला ॥ ९८ ॥ जैसी पक्वान्नांत पडिली मक्षिका ॥ कीं दुग्धामाजी लवणकणिका ॥ कीं प्रेमळांमाजी लटिका ॥ कुटिल येऊन बैसला ॥ ९९ ॥ कीं तारुण्यदशेंत क्षयरोग ॥ कीं विप्रसभेंत प्रकटला मांग ॥ नातरी विरक्तासी स्त्रीसंग ॥ कर्मयोगें जोडला ॥ २०० ॥ कीं क्षेत्र पिकासी आलें बहुत ॥ तों टोळधाड पडली अकस्मात ॥ कीं पश्चिमधान्यावरी मार्गशीर्षांत ॥ तांबारा अविचित पडियेला ॥ १ ॥ नातरी गगनीं वोळल्या पर्जन्यधारा ॥ तों अकस्मात सुटला दक्षिणवारा ॥ कीं पौर्णिमेचा चंद्र उगवतां बरा ॥ तंव राहु प्रगटला त्याआड ॥ २ ॥ तेवीं दान देतेअवसरीं ॥ यांस अभिमान पातला वैरी ॥ जेणें होय याची बोहरी ॥ तैसीच परी करावी ॥ ३ ॥ मग लोकांसी म्हणे वैष्णवभक्त ॥ देशावर आणिलें तुम्हीं समस्त ॥ तरी चुकलें वांकलें गांवांत ॥ राहूं सर्वथा न द्यावें ॥ ४ ॥ लोक म्हणती ते वेळ ॥ गांवांत साळी एक दुबळ ॥ तो निंदक नष्ट महाखळ ॥ नाहीं प्रेमळ अंतरीं ॥ ५ ॥ तो एक राहिला असे जाण ॥ इतरीं दिधलें शक्तिप्रमाण ॥ ऐसें ऐकोनि वचन ॥ भक्त प्रेमळ बोलती ॥ ६ ॥ तुम्ही जाऊन त्याचे मंदिरीं ॥ माझा निरोप सांगा सत्वरीं ॥ रुका अधेला कांहीं तरी ॥ आणा धर्मार्थ मागुनी ॥ ७ ॥ ऐकूनि तुकयाचें वचन ॥ आश्चर्य करिती सकळ जन ॥ मग साळियाचे घरासी जाऊन ॥ अंगणीं उभे राहिले ॥ ८ ॥ परी तो कांहींच न बोले वचनासी ॥ पांजणी करी वेगेंसीं ॥ तुम्ही कोण आलेत कासयासी ॥ उत्तर कोणासी करीना ॥ ९ ॥ गांवकरी विस्मित होऊन ॥ एकमेकांसी सांगती खूण ॥ म्हणती तुकयाचे भिडेकरून ॥ मूर्खापासीं पातलों ॥ २१० ॥ परी हा कांहीं न बोले वचन ॥ मग बोलते जाहले सकळ जन ॥ पंढरीचे

हरिदास आले जाण ॥ एक मास कीर्तन होतसे ॥ ११ ॥ कांहीं देशावर मागावयासी ॥ तुकयानें पाठविलें तुजपासीं ॥ वचनें ऐकोनि ऐसीं ॥ मूर्ख मानसीं संतापला ॥ १२ ॥ म्हणे तुकयानें मांडिली बडबड ॥ तैंपासोनि तुम्हां लागलें वेड ॥ सांडोनियां लौकिकचाड ॥ नाचतां उघड कीर्तनीं ॥ १३ ॥ आपुल्या संसारा पाडूनि तुटी ॥ आतां कां घेतसां माझी पाठी ॥ घरीं नाहीं थाळा वाटी ॥ मी तुम्हांसी शेवटीं काय देऊं ॥ १४ ॥ ऐकूनि मूर्खाचें वचन ॥ कांता बोले त्यालागून. ॥ थोर थोर लोक तुकयाचे वचनें ॥ अंगणीं येऊन उभे कीं ॥ १५ ॥ तुम्ही निदक परम खळ ॥ मुखें न बोला शब्द रसाळ ॥ बैसावयासी निर्मळ स्थळ ॥ तेंही न मिळे सर्वथा ॥ १६ ॥ आतां विवेक करूनि चित्तीं ॥ कांहीं तरी द्यावें यांप्रती ॥ ऐकोनि कांतेची वचनोक्ती ॥ मूर्ख चित्तीं संतापला ॥ १७ ॥ सक्रोध होऊनि बोले काय ॥ एक तांब्या घरांत आहे ॥ तो यांस देऊनि लवलाहें ॥ वाटे लावीं सत्वर ॥ १८ ॥ ऐकूनि भ्रताराचें वचन ॥ कांता पावली समाधान ॥ मग उदकपात्र आणून ॥ त्यांचे करीं दीधलें ॥ १९ ॥ त्यानें दिधलें डाव्या करीं ॥ यांनीं लाभ अनुभविला अंतरीं ॥ तांब्या घेवोनियां करीं ॥ निघाले झडकरी तेथूनी ॥ २२० ॥ आश्चर्य करिताती सकळ ॥ म्हणती प्रसन्न जाहला खळ ॥ दावाग्नि होय शीतळ ॥ कीं शेरास फळ जैसें आलें ॥ २१ ॥ आजि शुष्क काष्ठास अंकुर फुटला ॥ कीं पाषाणासी धर्म दाटला ॥ कीं राहु सोज्ज्वळ होऊनि भला ॥ प्रकाश पाडिला जगावरी ॥ २२ ॥ तैसेंचि घडोनि आलें स्पष्ट ॥ जे उदारत्व धरी हा परम नष्ट ॥ एक म्हणती आपुलें अदृष्ट ॥ सानुकूल होतें कीं ॥ २३ ॥ ऐसें बोलोनि परस्पर ॥ तुकयापासीं आले सत्वर ॥ पुढें ठेवूनि उदकपात्र ॥ करिती नमस्कार तेधवां

॥ २४ ॥ तें देखोनि वैष्णव वीर ॥ लोकांसी बोले प्रतिउत्तर ॥ तो साळी आहे मोठा उदार ॥ दिधलें देशावर बहुतचि ॥ २५ ॥ आपुले करें घेऊनि त्वरित ॥ म्हणती हें आहे सुवर्णपात्र ॥ तुम्हांस न कळलें अणुमात्र ॥ परीक्षा स्वतंत्र कळेना ॥ २६ ॥ लोक म्हणती तये वेळ ॥ हें पितळेचें पात्र सोज्वळ ॥ उजळोनि केलें अति निर्मळ ॥ कांचना-ऐसें दिसतें कीं ॥ २७ ॥ अग्नींत तावून पाहतां जाण ॥ तंव तें आहे शुद्ध सुवर्ण ॥ ऐसें कौतुक देखोन ॥ विस्मित मन सकळांचें ॥ २८ ॥ म्हणती अघटित संतांचा महिमा ॥ पितळेची दवडिली काळिमा ॥ अद्भुत तुकयाचा भजनप्रेमा ॥ द्यावया उपमा नसे कीं ॥ २९ ॥ मग हरिदासांसी बोलावून ॥ केलें तयांचें चरणक्षालन ॥ पुष्पहार गळां घालून ॥ दिधलीं वस्त्रें सकळांसी ॥ २३० ॥ गांवकरी म्हणती देशावर ॥ आणिला करा अंगीकार ॥ सकळ करिती नमस्कार ॥ अति आदरेंकरूनी ॥ ३१ ॥ मग वैष्णव तुका काय बोलत ॥ ग्राम-वासी हे उदार बहुत ॥ यांनीं द्रव्य उकळोनि त्वरित ॥ दिधलें निश्चित तुम्हांसी ॥ ३२ ॥ एक दुर्बळ साळी ग्रामवासी ॥ परम शठ म्हणती त्यासी ॥ त्यानें सुवर्णपात्र तुम्हांसी ॥ मनोभावेंसीं अर्पिलें ॥ ३३ ॥ हें तुळसीदळ अंगीकारून ॥ करावें आपुल्या पुत्राचें लग्न ॥ ऐसें बोलूनियां वचन ॥ वंदिले चरण सद्भावें ॥ ३४ ॥ आम्ही एक उदार दाते जनीं ॥ हा अभिमान होता ज्यांचे मनीं ॥ ते हें कौतुक देखोनि नयनीं ॥ लज्जित होऊनि राहिले ॥ ३५ ॥ हरिदास संतोष मानूनि बहुत ॥ पंढरपुरासि गेले त्वरित ॥ प्रेमळ तुका अति विरक्त ॥ देहू-ग्रामासी पातला ॥ ३६ ॥ सांडोनियां सन्मानपूजा ॥ हृदयीं चिंती अधोक्षजा ॥ दीन अनाथ आणि राजा ॥ सारिखेचि मानी दृष्टीसी ॥ ३७ ॥ तंव एके दिवसीं प्रेमळ भक्त ॥ किंचित होता निद्रित ॥

तों दृष्टांत देखिला साक्षात ॥ तो परिसा श्रोते भाविक हो ॥ ३८ ॥ इंद्रायणीचे स्नानास जात ॥ तंव काय करीत पंढरीनाथ ॥ विप्राचा वेष धरूनि त्वरित ॥ तुकयासी अवचित भेटले ॥ ३९ ॥ ब्राह्मण देखोनि दृष्टीसी ॥ साष्टांग नमस्कार घातला तयासी ॥ मग तुकयाचे मस्तकीं हृषीकेशी ॥ हस्त ठेवीत निजकृपें ॥ २४० ॥ उपदेश देतांचि त्या अवसरा ॥ नमस्कार केला द्विजवरा ॥ म्हणे स्वामी येऊनि माझिया घरा ॥ भोजन करा निजप्रीतीं ॥ ४१ ॥ त्यावरी ब्राह्मण उत्तर देत ॥ आम्हांस पावशेर पाहिजे घृत ॥ तें देशील तरी निश्चित ॥ येतों त्वरित घरासी ॥ ४२ ॥ अवश्य म्हणूनि ते अवसरीं ॥ विप्रासी धरिला आपुले करीं ॥ सत्वर येऊनि स्वमंदिरीं ॥ कांतेप्रती बोलत ॥ ४३ ॥ ब्राह्मण क्षुधित उपवासी ॥ तरी शिधा साहित्य द्यावें त्यासी ॥ पावशेर घृत नित्य भोजनासी ॥ मनोभावेंसी अर्पावें ॥ ४४ ॥ ऐसें बोलतांचि वचन ॥ कांता जाहली क्रोधायमान ॥ म्हणे कोठोनि आणिला ब्राह्मण ॥ घृत कोठून म्यां द्यावें ॥ ४५ ॥ ऐसें ऐकोनि कठीणोत्तर ॥ अदृश्य झाले शार्ङ्गधर ॥ जो लीलानाटकी सर्वेश्वर ॥ कौतुक दाखवी निजभक्तांसी ॥ ४६ ॥ ऐसा देखोनि स्वप्नसंभ्रम ॥ जागृतीस आले तुकाराम ॥ हृदयीं अद्भुत दाटलें प्रेम ॥ कौतुक निरुपम देखोनी ॥ ४७॥ म्हणती कृपा केली सद्गुरुनाथें ॥ परी सेवा घडली नाहीं मातें ॥ मार्गीं जातां गंगास्नानातें ॥ सांपडविलें मजलागीं ॥ ४८ ॥ मस्तकीं ठेवूनियां कर ॥ घृत मागोनि पावशेर ॥ घरीं कलह मांडिला थोर ॥ गेले सत्वर म्हणूनी ॥ ४९ ॥ केशवचैतन्य राघवचैतन्य ॥ सांगितली माळिकेची खूण ॥ बाबाजी आपुलें नामाभिधान । बोलिले वचन सद्गुरु ॥ २५० ॥ आवडीचा मंत्र झडकरी ॥ सांगितला रामकृष्ण-हरी ॥ जो प्रीतीकरूनि त्रिपुरारी ॥ निरंतरीं जपतसे ॥ ५१ ॥

माघ शुद्ध दशमी साचार ॥ पाहोनियां गुरुवार ॥ माझा करूनि अंगीकार ॥ गेले सत्वर सद्गुरु ॥ ५२ ॥ ऐसा विश्वास धरून ॥ प्रेमें करी हरिभजन ॥ रात्रीं आनंदेंकरून ॥ करीत कीर्तन निजनिष्ठें ॥ ५३ ॥ नानापरींचे दृष्टांत अनेक ॥ रसाळ कवित्व प्रासादिक ॥ श्रवणीं ऐकतां सभाग्य लोक ॥ होती तल्लीन मानसीं ॥ ५४ ॥ म्हणती हा नव्हे मानववीर ॥ केवळ ईश्वरी अवतार ॥ याचेनि मुखें रुक्मिणीवर ॥ करी उद्धार जनांचा ॥ ५५ ॥ ऐसी प्रतिष्ठा वाढतां जनीं ॥ दुरात्मे संतप्त जाहले मनीं ॥ म्हणती शास्त्रमार्ग टाकोनी ॥ पाखंडवाणी बोलतसे ॥ ५६ ॥ कर्ममार्ग सकळ बुडवून ॥ भजनीं लाविले भाविक जन ॥ एक भक्तिमार्गावांचून ॥ न बोले आन सर्वथा ॥ ५७ ॥ तुकयानें केलें कवित ॥ त्या वह्या बांधोन वस्त्रांत ॥ उदकांत बुडवाव्या त्वरित ॥ विचार निश्चित दृढ केला ॥ ५८ ॥ जैसी गंडिकामूर्ती देखोनी ॥ यवन उगेंचि जळती मनीं ॥ मग अंतरीं कुमती धरूनि ॥ टाकूं फोडून म्हणताती ॥ ५९ ॥ कां पिंजऱ्यांत शुक बैसोन ॥ स्वच्छंदें करी रामभजन ॥ तो शद्ब कानीं ऐकून ॥ ससाणा मनीं संतापे ॥ २६० ॥ नातरी व्रत करितां एकादशी ॥ मान्यत्व पावला अंबऋषी ॥ मग दुर्वास संतप्त होऊनि मानसीं ॥ पातला छळणासी सक्रोध ॥ ६१ ॥ तैशापरी ते दुर्जन ॥ प्रवेशले तुकयाचें सदन ॥ म्हणती तुवां पाखंड रचून ॥ लाविले जन भक्तीसी ॥ ६२ ॥ हे तुझी प्राकृत अशुद्ध वाणी ॥ सर्वथा ऐकूं नये श्रवणीं ॥ ऐसें म्हणूनि त्या दुर्जनीं ॥ पुस्तकें हिरोनि घेतलीं ॥ ६३ ॥ मोटा बांधोनि सत्वरी ॥ पाषाण घातले त्यांभीतरीं ॥ नेऊनि इंद्रायणीचे तीरीं ॥ उदकामाझारी बुडविल्या ॥ ६४ ॥ ब्राह्मण म्हणती तुकयालागून ॥ तेरा दिवसांचा घातला पण ॥ जरी कोरडे काढील

जगज्जीवन ॥ तरी मानूं प्रमाण यथार्थ ॥ ६५ ॥ ऐसें बोलोनि ते अवसरीं ॥ गेले सत्वर आपुले घरीं ॥ तुकयाचिया चित्तांतरीं ॥ विक्षेप फार वाढला ॥ ६६ ॥ जैसी कांचेची कुपी ओतिली ॥ ते अवचित फोडूनि टाकिली ॥ कां पट्टदुकूलाची घडी केली ॥ ते पावकें जाळिली अकस्मात ॥ ६७ ॥ नातरी बकुळाचा वृक्ष लागला ॥ तो अजापाळकें तोडोनि टाकिला ॥ विक्षेप वाटे बनकराला ॥ तैसें तुकयाला जाहलें कीं ॥ ६८ ॥ कीं निर्जळ वर्नांच्या विहिरी बुजवितां ॥ तळमळ करी कनवाळू दाता ॥ नातरी तुळसीवन बोकडें खंडितां ॥ वैष्णवभक्तां विक्षेप ॥ ६९ ॥ कां षड्स रांधिलें पक्वान्न ॥ त्यासी अकस्मात शिवे श्वान ॥ मग स्वयंपाकीण विक्षेप पावोन ॥ उद्विग्न मनीं होतसे ॥ २७० ॥ कीं गार म्हणोनि अकस्मात ॥ मुक्ताफळ टाकिलें अग्नींत ॥ मग जोहरी आपुले चित्तांत ॥ हळहळ करीत मानसीं ॥ ७१ ॥ तेवीं वह्या बुडवितां दुर्जन ॥ तुकयाचें विक्षेप पावलें मन ॥ जाहलें प्रेमाचें खंडन ॥ अरिष्ट दारुण देखोनी ॥ ७२ ॥ मग देऊळांत येऊनि ते अवसरीं ॥ धरणें घेतलें महाद्वारीं ॥ जैसी द्वारांतली पायरी ॥ उठों नेणेच सर्वथा ॥ ७३ ॥ म्हणे अनाथनाथा पंढरीराया ॥ मजहातीं कष्ट करविले वायां ॥ शेवटीं अरिष्ट उठवोनियां ॥ बुडविल्या वह्या उदकांत ॥ ७४ ॥ तुवां स्वप्नीं येऊनि वनमाळी ॥ मज मतिमूढासी आज्ञा केली ॥ जे नामदेवाची बाकी राहिली ॥ ते बोलविली प्रासादिक ॥ ७५ ॥ ऐसें असतां रुक्मिणीकांता ॥ तरी हें अरिष्ट ओढवलें कां आतां ॥ बरें जें येईल तुझिया चित्ता ॥ तें पंढरीनाथा करावें ॥ ७६ ॥ ऐसें म्हणोनि ते अवसरीं ॥ रूप आठविलें निजअंतरीं ॥ मुखीं मंत्र रामकृष्णहरी ॥ सप्रेमभरीं जपतसे ॥ ७७ ॥ न घे फल मूल अथवा

अन्न ॥ न बोले कोणासी प्रतिवचन ॥ सांडोनि देहलोभ आशा जाण ॥ उदकपान करीना ॥ ७८ ॥ हें निर्वाण देखोनि जगज्जीवनें ॥ बाळरूप सांवळें धरिलें सगुण ॥ तुकयाचें करावया समाधान ॥ रुक्मिणीरमण पातला ॥ ७९ ॥ मस्तकीं ठेवूनि अभयकर ॥ म्हणे तुझें स्वस्थ असों दे अंतर ॥ अरिष्ट जाहलें जें दुर्धर ॥ तें मी शार्ङ्गधर निवारितों ॥ २८० ॥ ऐसें बोलोनि ते वेळ ॥ अदृश्य जाहला तमालनीळ ॥ कीं तुकयाचें हृदयकमळ ॥ देखिलें निर्मळ बैसावया ॥ ८१ ॥ तेथेंचि अदृश्य होउनी ॥ सुरवाडले चक्रपाणी ॥ पदसंधीचे निरूपणीं ॥ मजलागोनी भासतें ॥ ८२ ॥ ऐसे तेरा दिवस लोटतां जाण ॥ पुस्तकें पाहती विचक्षण ॥ तों अक्षरांलागीं जीवन ॥ आतळलें नाहीं सर्वथा ॥ ८३ ॥ म्हणती अन्याय घडला नेणतपणें ॥ विष्णुभक्ताचें केलें छळण ॥ परी तयाचा साह्य जगज्जीवन ॥ अरिष्ट दारुण निरसिलें ॥ ८४ ॥ ऐसा अनुताप धरूनि अंतरीं ॥ सत्वर आले महाद्वारीं ॥ तुकयासी म्हणती ते अवसरीं ॥ पावले श्रीहरी तुजलागीं ॥ ८५ ॥ कोरडे कागद निघाले जाण ॥ आतां पाहें दृष्टि उघडून ॥ ऐसें म्हणोनि सकळ जन ॥ करिती नमन साष्टांगीं ॥ ८६ ॥ म्हणती जयासी साह्य रुक्मिणीपती ॥ तेथें आमुचा अपाय तो किती ॥ अमृतकुपींत रोग शिरती ॥ हें कल्पांतीं घडेना ॥ ८७ ॥ नातरी भास्कराचिया घरा ॥ प्रवेश नव्हेचि अंधकारा ॥ कीं चंद्रमंडळांत उबारा ॥ रिघों न शके जया रीतीं ॥ ८८ ॥ तेवीं विष्णुभक्तावरी प्रयत्न ॥ करितां अरिष्ट न चले जाण ॥ ऐसें परस्परें बोलोनि वचन ॥ नामस्मरण करिताती ॥ ८९ ॥ तुकया जों नेत्र उघडोनी ॥ पुढें पाहे विलोकूनी ॥ तों कोरड्याचि वह्या ब्राह्मणांनीं ॥ देउळीं आणूनी ठेविल्या ॥ २९० ॥ हें कौतुक

दृष्टीसी देखोन ॥ चित्तीं वाटलें समाधान ॥ जैसें अंधासी नेत्र येतां जाण ॥ उल्हासे मन तयाचें ॥ ९१ ॥ कीं मुखीं घालितां सुधारस ॥ मृत प्रेत उठोन सोडी श्वास ॥ तैसा तुकयाचे मनीं उल्हास ॥ म्हणे पंढरीनिवास पावला ॥ ९२ ॥ बद्धांजली जोडूनि मग ॥ स्वमुखें बोलिला सात अभंग ॥ तो अनुपम बहुत प्रेमरंग ॥ वर्णितां न ये सर्वथा ॥ ९३ ॥ परी किंचित अन्वय यथानिगुतीं ॥ परिसा श्रवणीं निजप्रीतीं ॥ तुकयानें लाविलीं नेत्रपातीं ॥ सद्गद चित्तीं होउनी ॥ ९४॥ म्हणे जयजयाजी श्रीविठ्ठला ॥ बहुत अन्याय मज घडला ॥ लागूनि लोकांचिया बोला ॥ भार घातला तुजवरी ॥ ९५ ॥ तुज केला बहुत शीण ॥ मी तंव अधम यातिहीन ॥ तेरा दिवस झांकोनि नयन ॥ तुझ्या द्वारीं बैसलों ॥ ९६ ॥ ताहानभुकेचें कोडें श्रीहरी ॥ तोही भार घातला तुजवरी ॥ माझिया बैसोनि हृदयमंदिरीं ॥ योगक्षेम मुरारी त्वां केला ॥ ९७ ॥ उदकीं कोरडे राखिले कागद ॥ चुकविला लौकिक अपवाद ॥ त्वां अनाथनाथें आपुलें बिरुद ॥ साच केलें दयाळा ॥ ९८ ॥ बाळवेष धरूनि निगुतीं ॥ मज भेटलासी रुक्मिणीपती ॥ समाधान करूनि प्रीतीं ॥ अभय निजहस्तें दीधलें ॥ ९९ ॥ आतां कापोत माझी मान ॥ सुखें पीडा करोत दुर्जन ॥ परी कदापि संकट तुजकारण ॥ न घालीं जाण सर्वथा ॥ ३०० ॥ मी तंव चांडाळ दुष्ट पतित ॥ एकदां चुकी पडली यथार्थ ॥ उभें करूनि उदकांत ॥ वह्या राखविल्या तुजहातीं ॥ १ ॥ समर्थासी घालावया भार ॥ आपुल्यास नाहीं अधिकार ॥ हें सर्वथा नेणेंच मी पामर ॥ विवेकविचार कळेना ॥ २ ॥ होऊनि गेली जे श्रीपती ॥ ते गोष्टी परतोनि न ये पुढती ॥ पुढें तरी रुक्मिणीपती ॥ संकट तुजवरी घालींना ॥ ३ ॥ मानेवरी ठेविली नसतां सुरी ॥ घाय न

हाणितां पाठीवरी ॥ तों म्यां उतावीळ होऊनि श्रीहरी ॥ आक्रांत तुजवरी हा केला ॥ ४ ॥ मजपासीं आणि डोहाआंत ॥ दों ठायीं वांटलें तुझें चित्त ॥ दोन्ही चुकवूनियां आघात ॥ वाढविली कीर्ति लौकिकीं ॥ ५ ॥ तुज म्हणों मायबापासमान ॥ परी तीं स्वल्पासाठीं घेऊं पाहती प्राण ॥ म्यां तों अघटित केलें जाण ॥ परी साह्य जगज्जीवन तूं एक ॥ ६ ॥ तूं कृपासागर चक्रपाणी ॥ तुजसमान न देखों त्रिभुवनीं ॥ स्तुति करावी प्रीतीकरूनी ॥ तरी कुंठित वाणी जाहली कीं ॥ ७ ॥ तूं दीनबंधु दयाळ ॥ शशीपरीस अति शीतळ ॥ माउलीपरीस स्नेहाळ ॥ येती कल्लोळ प्रेमाचे ॥ ८ ॥ तूं अनिर्वाच्य देवाधिदेव ॥ उपमा द्यावयासी नाहीं ठाव ॥ सकळ जीवांचाही जीव ॥ निवाला शिव नाम जपतां ॥ ९ ॥ महद्भूतें पांच निर्माण ॥ तींही तुजपासोनि जाण ॥ गोड म्हणूं अमृतासमान ॥ तरी तूं जगज्जीवन त्यापरता ॥ २१० ॥ आतां न बोलतां कांहीं ॥ उगाचि माथा ठेवितों पायीं ॥ अनंत अपराध विठाबाई ॥ क्षमा करीं तूं स्नेहाळे ॥ ११ ॥ मी अवगुणी अन्यायी फार ॥ किती सांगों वारंवार ॥ पुरे पुरे हा संसार ॥ चित्त स्थिर होऊं नेदी ॥ १२ ॥ अनंत बुद्धीचे विकल्प जाण ॥ तरंग पालटती क्षणक्षण ॥ संसर्ग करितां जाण ॥ तैं बद्ध मन होतसे ॥ १३ ॥ देवाधिदेवा पंढरीनाथा ॥ सकळ निरसीं माझी चिंता ॥ कर्मजाळ निरसोन अनंता ॥ हृदयमंदिरीं असावें ॥ १४ ॥ ऐशिया रीतीं तुकयान ॥ प्रेमें आळविला श्रीरुक्मिणी-रमण ॥ मग अंतरगाभारां रिघोन ॥ दिधलें आलिंगन देवासी ॥ १५ ॥ सगुण स्वरूपीं गुंतले लोचन ॥ मुखें करीत नामस्मरण ॥ पुढें देहासहित तुकाराम जाण ॥ वैकुंठभुवन पावला ॥ १६ ॥ ते कथा सविस्तर ल्याहावी ग्रंथीं ॥ तों हृदयस्थ सांगे रुक्मिणीपती ॥

कीं तुकाराम अद्यापि तेच स्थितीं ॥ आहे निश्चितीं इहलोकीं ॥ १७ ॥ निजनिष्ठ जे कां प्रेमळ भक्त ॥ तयांसी स्वप्नीं दर्शन देत ॥ जैसा दत्तात्रेय अनसूयासुत ॥ स्वेच्छा विचरत भूमंडळीं ॥ १८ ॥ याचा संशय वाटेल मनीं ॥ तरी साक्ष ऐकिजे संतसज्जनीं ॥ निळोबाच्ते स्वप्नीं येऊनी ॥ उपदेश केला निजकृपें ॥ १९ ॥ जरी चित्तीं शुद्ध असेल प्रेम ॥ त्यासी उपदेश देती तुकाराम ॥ तो जगद्गुरु निरुपम ॥ अद्यापि असे चिरंजीव ॥ ३२० ॥ त्यानें कृपा करून एकांतीं ॥ ग्रंथ लिहविला माझे हातीं ॥ तरी येविषयीं विचक्षण श्रोतीं ॥ संशय चित्तीं न धरावा ॥ २१ ॥ तो विश्वव्यापक चैतन्यघन ॥ सद्गुरु तुकाराम आम्हांलागून ॥ महीपति तया अनन्य शरण ॥ देहाभिमान टाकोनी ॥ २२ ॥ स्वस्ति श्रीभक्तविजय ग्रंथ ॥ ऐकतां तुष्टेल जगन्नाथ ॥ प्रेमळ ऐका भाविक भक्त ॥ द्विपंचाशत्तमाध्याय रसाळ हा ॥ ३२२ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अध्याय ॥ ५२ ॥ ओंव्या ॥ ३२३ ॥

---

# टीपा व स्पष्टीकरण

## श्रीएकनाथचरित्र

**म**हाराष्ट्रांत गेल्या सातशें वर्षांत जे हजार बाराशें लहान मोठे संतकवि होऊन गेले त्यांपैकीं प्रमुखांत एकनाथांची गणना होते. हे सुमारें ३५० वर्षांपूर्वी पैठण येथें होऊन गेले. यांच्या संबंधाची विस्तृत माहिती अनेक जुन्या व नव्या चरित्रग्रंथांत दिली आहे ती संक्षेपानें येथें देतों.

एकनाथ हे ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. त्यांचा जन्मशक उपलब्ध नाहीं; आपला जन्म मूळनक्षत्रीं झाला असें त्यांनींच स्वतः एका अभंगांत सांगितलें आहे. एकनाथांचे पणजे भानुदास यांचेंही नांव महाराष्ट्र संतमंडळांत विख्यात आहे. अनागोंदीच्या राजानें आपल्या नगरीं नेलेली पंढरपूरच्या पांडुरंगाची मूर्ति भानुदासांनीं परत आणली अशी कथा आहे. त्यांचा पुत्र चक्रपाणि हाही हरिभक्त होता. चक्रपाणीचा मुलगा सूर्यनारायण हा एकनाथांचा पिता. तो व त्याची पत्नी नाथजन्मानंतर थोड्याच दिवसांनी निवर्तल्यामुळें नाथाचें संगोपन त्यांचे आजे चक्रपाणि यांनीं केलें. वयाच्या पांचव्या सहाव्या वर्षापर्यंत लेखन वाचन व ब्राह्मणोचित ब्रह्मकर्म इत्यादिकांचें शिक्षण एकनाथांनीं संपादिलें व व्रतबंध झाल्यावर, आजोबांची आज्ञा न घेतांच एके दिवशीं उठून ते देवगिरी किल्ल्यावर जनार्दनस्वामी नामक एक सत्पुरुष राहात होते त्यांजकडे गेले. स्वामीपाशीं बरींच वर्षे राहून व त्यांची एकनिष्ठेनें सेवाचाकरी करून त्यांची त्यांनीं कृपा संपादन केली. स्वामींनीं त्यांना दत्तात्रेयाचें दर्शन घडविलें. पुढें एकनाथ तीर्थयात्रेस गेले. हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व प्रसिद्ध तीर्थक्षेत्रें पाहिल्यावर ते पैठणास आले आणि त्यांनीं गृहस्थाश्रम स्वीकारला. त्यांच्या पत्नीचें नांव गिरिजाबाई. नाथांनीं आपलें पुढील आयुष्य कथाकीर्तनांत आणि ग्रंथलेखनांत व्यतीत केलें. त्यांची गुरुभक्ति आणि भूतदया प्राचीन चरित्रकारांनीं विशेषत्वानें वर्णिली आहे. ज्ञानेश्वरांनंतरच्या ३०० वर्षांत अपपाठांमुळें अशुद्ध झालेल्या ज्ञानेश्वरीचें संशोधन करून एकनाथांनीं तिची शुद्ध प्रत तयार केली. त्यांनीं स्वतः सुमारें ६०,००० कविता लिहिली व ती बहुतेक सगळी छापून प्रसिद्ध झाली आहे. एकनाथी भागवत, भावार्थरामायण, रुक्मिणीस्वयंवर हे त्यांचे मुख्य ग्रंथ होत. यांशिवाय हस्तामलक, चतुःश्लोकी

भागवत वगैरे चारपांच ओवीबद्ध प्रकरणें व सुमारें २।३ हजार अभंग त्यांनीं लिहिले आहेत. त्यांची वाणी प्रौढ, प्रासादिक आणि रसाळ आहे. नाथांनीं भक्तिमार्गाचा प्रसार मोठ्या प्रमाणावर केला. शके १५२१ विकारी संवत्सर फाल्गुन वद्य ६ रविवार या दिवशीं नाथ पैठण येथें समाधिस्थ झाले. ही नाथषष्ठी महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहे. प्रसिद्ध महाराष्ट्र कवि मुक्तेश्वर हा एकनाथांचा नातू–मुलीचा मुलगा.

## टीपा व शब्दार्थ, अध्याय १ ला.

**ओवी** ( १ )—रसिक = रसभरित, रसाळ. महीपतींनीं कथेला येथें ‘ रसिक ’ हें विशेषण लावलें आहे तें योग्य नाहीं. मनुष्य रसिक असूं शकेल, पण कविता रसिक असणें शक्य नाहीं. महीपती शब्द फारसे तोलून वापरीत नाहींत. भवरोगदु:ख = संसाररूपी रोगामुळें होणारी व्यथा. संसार हा एक रोग आहे असा पारमार्थिक कविसंकेत आहे. निजशांतिसुख=विवेकाच्या योगें शाश्वत काय आणि अशाश्वत काय हें समजलें म्हणजे मनाची तळमळ नाहींशीं होऊन तें शांत–निश्चल–होतें. ( २ ) वैकुंठभुवन=श्रीविष्णूचें वास्तव्यस्थान, वैकुंठलोक. ( ३ ) शास्त्रव्युत्पत्ति=भाषाशास्त्र, व्याकरणशास्त्र वगैरे. अंगासि न येतां वैराग्यस्थिति=अंगीं वैराग्य न बाणतांही, वैराग्य प्राप्त झालें नसतांही. ( ४ ) रसनाविषय = गोड गोड पदार्थ खाण्याची इच्छा. शम=शांत, तृप्त. पुरुषोत्तम=परमेश्वर, श्रीविष्णु. ( ५ ) कृपणता=कवडीचुंबकपणा, कंजूषपणा. ( ६ ) लोहदंड=लोखंडाचा दांडा. परीस=ज्याचा स्पर्श लोखंडास झाला असतां त्याचें सोनें होतें असा एक कविकल्पित दगड. विवेकभेट=विचाराची भेट, विवेकाची प्राप्ति, विचार उत्पन्न होणें. पारमार्थिक विवेक या अर्थानें हा शब्द शब्द येथें उपयोजिला आहे. ( ७ ) कोडी=जोड, सांठा. प्राक्तनहीन=कर्मदरिद्री, फुटक्या नशिबाचीं. विकल्पें=संशयानें. ( ८ ) दैवाआगळे=सुदैवी; आगळें म्हणजे विशेष दैव आहे ज्यांचें ते. गराळ=चषक, घोंट ( ९ ) भानुदास=हे एकनाथांचे प्रपितामह. अनागोंदीच्या राजानें नेलेली पंढरीच्या पांडुरंगाची मूर्ति यांनीं परत आणली अशी कथा आहे. ( १० ) वैष्णव=विष्णुभक्त. ( ११ ) ज्ञानप्रकाशें=ईश्वरविषयक ज्ञानाच्या प्रकाशानें. देदीप्यमान=तेजस्वी. सुलक्षण=चांगल्या लक्षणांची, सदाचरणी. ( १२ ) जगद्गुरु=जगाला ज्ञानोपदेश करणारा, जगाचा गुरु. साक्षात्=प्रत्यक्ष, मूर्तिमंत.

( १३ ) व्रतबंध=मौंजीबंधन, मुंज. ( १४ ) ज्ञानराशी=महाज्ञानी. जनार्दन=हे एकनाथांचे गुरु. हे दौलताबादच्या नबाबाचे नोकर असूनही मोठे अधिकारी पुरुष होते. ( १५ ) सद्भावें=शुद्ध भावानें, भक्तिभावानें. नमस्कारी=नमस्कार करी, नमस्कार करिता झाला. विस्मित=आश्चर्यचकित. अंतरीं=मनांत. ( १६ ) संबोखोनि=आश्वासन देऊन, समाधान करून. ( १८ ) मधुरोत्तर=गोड भाषण. ब्राह्मणकुमर=ब्राह्मणाचा मुलगा. मूळशब्द कुमार. साचार=खरोखर. ( १९ ) अनुताप=पश्चात्ताप, ( २१ ) अहर्निशीं=रात्रंदिवस.( २३ ) विशाल=भव्य, मोठे. अनुपम=ज्याला उपमा नाहीं असें. ( २५ ) द्वैपायन=व्यास, महाभारतकार. संशयवनीं=संशयाच्या रानांत, संशयांत. ( २६ ) हंसरूप नारायण=हंसाचें रूप धारण केलेला श्रीविष्णु. विरिंची=ब्रह्मदेव. ( २८ ) त्याजकारण=त्याला ( जनार्दनस्वामींना ). ( २९ ) विनीत=नम्र. ( ३० ) प्रक्षाळावयासी=धुवावयास. ( ३१ ) सुमन=फूल. ( ३२ ) शेष=उरलेलें. उच्छिष्ट=उष्टावलेलें अन्न, पानांत सांडलेले अन्न. निजप्रीती=आवडीनें, मनापासून. ( ३३ ) बहिर्भूमीचें जें स्थल=शौचास जाण्याची जागा, शौचकूप. ( ३६ ) दारुण=फार, मोठी. ( ३९ ) प्रवीण=निपुण, माहितगार. ( ४१ ) स्वरूपीं=आत्मस्वरूपाकडे. ( ४२ ) खरडा=कच्चा हिशेब. खतावणी=हिशेबाची चोपडी. ( ४३ ) रात्रीं दीपका.ी घातलें भरण=रात्रौ दिव्यांत आणखी तेल घातलें. अडका=पैसा. ( ४४ ) ताळा=मेळ. ( ४६ ) उपाहार=उप+आहार, फराळ. ( ४८ ) अंतर्गृहीं=घराच्या आंतल्या भागांत, माजघरांत. निश्चलत्वें=एकाग्रतेनें. ( ४९ ) सन्निध=जवळ. ( ५० ) संमुख=समोर. ( ५५ ) मजकारण=मला. ( ५६ ) रत=रममाण. ( ५७ ) ठाव प्रपंचाचा पुसिला=संसार समूळ नष्ट केला. ( ५८ ) जमाखर्च घडणी=जमाखर्चाची रचना. ( ५९ ) साल मजकूर=चालू वर्ष. गुदस्तां=गेल्या वर्षी. रुजू=दाखल. पूर्वसंस्कार=पूर्वजन्मींचा संस्कार. ( ६१ ) मनसूर=राजाज्ञापत्रिका. ( ६२ ) नरदेहजमा=मनुष्यदेह हीच जमा ( जमेचा आंकडा ). झाडियासी आणुनी=झाडा देऊन, हिशोब देऊन. अज्ञान बाकी=अज्ञान हीच राहिलेली शिल्लक. विनटलों=रत झालों, रंगलों. ( ६४ ) सोहं=सोऽहं आणि कोऽहं हे आध्यात्मिक शब्द आहेत. सोहं म्हणजे तो मी आहें आणि कोहं म्हणजे=मी कोण आहें ? खुर्दखत=अखत्यारपत्र. ( ६५ ) भवरोगपीडा=संसाररूपी रोगाचें दुःख. (६६) कैवल्यपुरासी=मुक्तीला. केवलपासून कैवल्य. चैतन्यहुडां=चैतन्यरूप बुरुजावर, चैतन्याच्या शिखरावर.

(६६) तहसील=मामलत. रसद=इजारा. शेखीं=शेवटीं. हुजत=पावती. (६७) पूर्वसुकृत=पूर्वजन्मींचें पुण्य. रामनामव्यापारीं=रामाच्या नांवाच्या व्यापारास. (७०) रामकृष्ण मंत्र=रामकृष्ण या नांवाचा उच्चार करण्याची आज्ञा. तारक=तारणारा, उद्धार करणारा. (७१) परमार्थयोग=परमार्थाचें साधन, जोड. गूढ=गहन. कठिण. हरिगुण-पवाडे=श्रीहरीचें गुणगायन. कोडें=कौतुकानें. (७३) विश्वोद्धार करावया-लागून=विश्वाचा उद्धार करण्यासाठीं. (७५) निर्भय असूनि त्वां मनें=तूं कोण-त्याही प्रकारचें भय मनांत न बाळगिता. (७६) ते=श्रीदत्तात्रेय. कडोविकडी=अकराळ विकराळ, भय उत्पन्न करणारी. पालट करिती घडोघडी=वरचेवर निरनिराळीं रूपें धारण करितात. रोकडी=तत्काळ, पाहिल्याबरोबर. चोखडी=चागली. येथें मुद्दाम असाही अर्थ होईल. (७७) उठाउठी=तांतडीनें, ताब-डतोब (७८). तुजकारण=तुला. निजप्रीतीनें=आवडीनें. (७९) माझेनि=माझ्याच्यानें. (८०) स्वमुखें करून=आपल्या तोंडानें, आपण होऊन. (८१) अनसूयासुत=अत्री ऋषींची भार्या अनसूया हिचा मुलगा श्रीदत्तात्रेय. (८२) अविंध=यवन, मुसलमान. अश्वावरुता=घोड्यावर. अवचिता=अकस्मात्, एकाएकीं. (८३) ओवीचा अर्थ—असलें विचित्र रूप पाहून एकनाथांना मनांत भय वाटलें. ते म्हणाले, हा तर प्रत्यक्ष यवन दिसतो. हा दत्तात्रेय आहे हें मला खरें वाटत नाहीं. (८४) अश्ववाहन=घोडा आहे वाहन ज्याचें. संनिध=जवळ. (८५) यवनभाषेनें=मुसलमानी भाषेंत. (८७) कनकताट=सोन्याचें ताट. षड्रस=सहा रसांनीं युक्त असे भोज्य पदार्थ. आंबट, गोड, कडू, तिखट, तुरट, आणि खारट हे षड्रस. गोमट=सुंदर, रुचकर. स्पष्ट=उघड उघड. सांगातें=(दत्तात्रेया) बरोबर. (८८) पैल=पलीकडे, जवळच. मूल=मुलगा. (९१) अत्रिनंदन=दत्तात्रेय. (९३) अभाग्य=अभागी, दुर्दैवी. नरू=नर, मनुष्य. डावलूनि=चुकवून. (९४) मुक्ताफळ=मोतीं. (९५) उठाउठी=एकाएकीं. (९६) वज्रासनयोग=योगशास्त्रांत जीं अनेक आसनें सांगितलीं आहेत त्यांपैकीं एक आसन. हें फार कठीण आहे. वाडेंकोडें=अल्प श्रमानें, सहजासहजीं. (९७) जीवमात्र=प्राणिमात्र. अघटित=न घडणारें, क्वचित्च घडणारें, अशक्य. (९८) निजबळें=आपल्या बाहुबळानें. (९९) पुढील भविष्य=पुढें घडून येणारी गोष्ट. साक्षात=प्रत्यक्ष, मूर्तिमंत. (१०१) अनायासें=कोणताही प्रयत्न न करितां. (१०१) मुद्रांकित=मुद्राधारी, शिष्य. (१०२) पितामह=आजा.

( १०३ ) निदिध्यास=एखाद्या गोष्टीचा सारखा ध्यास घेणें. ( १०५ ) आम्हां-कारण=आम्हाला, मला. (१०६) मलंगरूपें=फकिराच्या रूपानें. अवचितीं=अक-स्मात. ( १०७ ) मायारूप तेचि कामिनी=भगवंताची जी माया तीच पत्नी. ( मायेनें स्त्रीचें रूप घेतलें होतें. ) कामधेनु सवें दिसली सुनी=मलंगरूपी दत्तात्रेयाबरोबर कामधेनु कुत्रीच्या रूपानें आली होती. दत्तात्रेयाबरोबर चार कुत्रीं असतात असें पुराणांत सांगितलें आहे; आणि हे चार कुत्रे म्हणजे चार वेद होत असेंही सांगितलें आहे. ( ११० ) मृत्तिकापात्र=मातीचें भांडें, परळ. दोहिली शुनी=कुत्रीचें दूध काढलें. ( १११ ) पाचारूनि=बोलावून, हाक मारून. सवें=आमच्याबरोबर, पंक्तीला. ( ११२ ) मनात जाहले संकोचित=( नाथांना ) मनांत संकोच वाटला. अनुचित=अयोग्य, धर्मबाह्य. (११५) उच्छिष्ट ग्रास=आपल्या पानांतला घांस. निवांत स्थिती=निश्चल मनानें, शांत. ( १८ ) श्रुतिशास्त्रें=चार वेद व सहा शास्त्रें. मथित=सार, तात्पर्य. व्यासें काढिलें श्रीभागवत=चार वेद व सहा शास्त्रें याचें मंथन करून व्यासांनीं त्या सर्वांचा सारांश भागवत नामक ग्रंथाच्या रूपानें लिहिला. सखोल गुप्त=समजण्यास सोपा नाहीं असा, गूढ. भागवताच्या अकराव्या स्कंधावर नाथांनीं लिहिलेली विस्तृत ओवीबद्ध टीका 'एकनाथी भागवत' या नांवानें प्रसिद्ध आहे. ( ११९ ) भावार्थरामायण= हा नाथांचा दुसरा मोठा ग्रंथ. यांत रामायणातील कथा विस्तारानें सांगितली आहे. ( १२० ) पदपदांतरें=पदें, अभंग वगैरे स्फुट कविता. श्रीहरिचरित्र= श्रीकृष्णाचे चरित्र. श्रवणमात्रें=ऐकवून, श्रवण करवून. ( १२१ ) अभयकर= अभय देणारा हात. ( १२२ ) यथार्थ वाटलें चित्ता=मनाला बरें वाटलें, मनाचें समाधान झालें. केउता=कसा, कोठें. ( १२३ ) येरू=दुसरा. येथें एकनाथ. ( १२५ ) मायेचा=आईचा. ( १२६ ) दीपक=दिवा. द्रवत्व=पातळपणा. ( १२७ ) समीर=वारा. ( १२८ ) कल्लोळ=लाट. ( १२९ ) अवधान-लक्ष, चित्त. घनवटपण=जडत्व, दाटपणा. ( १३२ ) प्रतिष्ठानासी=पैठणास. गृहस्था-श्रम चालवीं=लग्न करून संसार कर. ( १३३ ) देवतार्चन=देवतेची पूजा. वैश्वदेव=संध्येप्रमाणेंच वैश्वदेव हें ब्राह्मणाचें एक नित्यकर्म आहे. अतिथि= आयत्या वेळीं जेवावयास येणारा, अभ्यागत. नित्यनैमित्तिक कर्माचरण=नित्य म्हणजे रोज करावयाचीं संध्यादि कर्मे व नैमित्तिक म्हणजे सणाच्या दिवशीं करावयाचीं किंवा श्राद्धादि कर्मे. ( १३४ ) अध्यात्मज्ञान=वेदांतादि परमार्थ विषयक ज्ञान. ( १३५ ) लोकाचारीं=लोकांच्या, बहुजनसमाजाच्या आचार

विचाराप्रमाणें, लोकसंग्रहाकरितां. ( १३६ ) यथाविधि=धर्मशास्त्रांत सांगितल्या-प्रमाणें. निर्धारीं=निश्चयपूर्वक. ( १३९ ) स्वदारागमन=आपल्या भार्येशीं समागम. ( १४० ) उपार्जन=सेवा. दृष्टीस न येती थोरसान=हा मोठा आणि हा लहान, हा श्रीमंत आणि हा गरीब असा भेदभाव धरीत नसे, सर्वांस समदृष्टीनें पहात असे. आन=अन्य, दुसरें. ( १४१ ) पुरातन=प्राचीन काळची. ( १४३ ) पुष्पांजलि=फुलांची ओंजळ. येथें कदाचित् मंत्रपुष्प असाही अर्थ होईल. ( १४८ ) प्रसादवाणी=जींत प्रसाद (प्रतिभा) आहे अशी वाणी. ( १४९ ) यामिनींत=रात्रौ. श्रीरघुनाथ=भगवान् रामचंद्र. ( १५० ) वाल्मीकि-कृत रामायण=आद्य कवि वाल्मीकि यांनीं लिहिलेला संस्कृत रामायण ग्रंथ. गहन=गूढ, समजण्यास कठिण, दुर्लभ. महाराष्ट्र टीका=मराठी टीका (भाषांतर). जनाकारणें=जनतेसाठीं, लोकांस. सप्तकांडें=वाल्मीकिरामायणाचीं, बालकांड, अयोध्याकांड, अरण्यकांड, किष्किंधाकांड, सुंदरकांड, युद्धकांड आणि उत्तरकांड अशीं सात कांडें आहेत. अभिप्राय=माथितार्थ, भावार्थ. ( १५४ ) भावार्थ म्हणती रामायण=ग्रंथाचें नांव भावार्थ रामायण ठेविलें. ( १५९ ) जानकीकांत=सीतापति रामचंद्र. ( १६१ ) अयोध्यापति=अयोद्धेचा राजा रामचंद्र. ( १६३ ) सीताशुद्धीस जातां मारुती=रावणानें सीतेस पळवून लंकेंतील अशोकवनांत नेऊन ठेवलें होतें. तिचा शोध करण्यासाठीं मारुतीस रामानें पाठविलें होतें. सीताशुद्धि म्हणजे सीतेचा शोध. सप्रेमचित्तीं= प्रेमभरित अंतःकरणानें. देहभ्रांति=देहाची शुद्धि. भ्रांति शद्वाचा खरा अर्थ भ्रम, पण महीपतींनीं येथें तो शद्ब शुद्धि या अर्थानें वापरला आहे. मीपण=मी एकनाथ आहें ही जाणीव. ( १६४ ) महेंद्रपर्वत=रामा-यणांत उल्लेखिलेला दक्षिणेकडील एक पर्वत. या पर्वतावरून मारुतीनें सीतेच्या शोधार्थ उड्डाण केलें. आविर्भाव=येथें अभिनिवेश असा अर्थ. ( १६८ ) किमर्थ=कां, कसे, कशासाठीं. १७२ व्या ओवीचा अर्थ=एखादा अलौकिक चमत्कार पाहून, तो चमत्कार करणाराविषयीं जरी आदर उत्पन्न झाला तरी ती शुद्ध भक्ति नव्हे; तो दांभिकपणा होय. १७३ व्या ओवीचा अर्थ=जाणून-बुजून परीस देव्हाऱ्यांत ठेवून त्याची षोडशोपचारें पूजा केली, तर तो दांभिक-पणा होय. कारण परिसाच्या स्पर्शानें लोखंडाचें सोनें होतें, हा चमत्कार त्या भक्तीला कारणीभूत आहे. म्हणून ती खरी भक्ति नव्हे. ( १७५ ) कल्प-तरु=इच्छिलेलें देणारा एक कविकल्पित वृक्ष. कामनिक=कांहीं तरी इच्छा मनांत

धरणारे, सकाम. १७७ व्या ओवीचा अर्थ=नातेवाईकास श्रीमंती आली म्हणून त्याच्या पूर्वीच्या निंदक सग्यासोयऱ्यांनीं जरी त्याचा आदर केला, तरी पूर्वीच्या अपमानाच्या आठवणीमुळें तो आदर त्याला प्रशस्त वाटत नाहीं. या ओवीच्या तिसऱ्या चरणांत ' आठवणें ' असा पाठ आहे तो अपपाठ असून त्याच्या ऐवजीं ' आठवूनि ' असा पाठ पाहिजे. ( १७९ ) जनार्दनसुत=जनार्दन-स्वामींचे शिष्य एकनाथ. सुत शब्दाचा अर्थ मुलगा, परंतु गुरुशिष्यांचें पिता-पुत्रांचें नातें असल्यामुळें शिष्य या शब्दाऐवजीं सुत शब्द उपयोजिण्याची जुन्या कवींची चाल आहे. ज्ञानदेवांनीं आपल्या ज्ञानेश्वरींत " निवृत्तिनाथसुतें " या शब्दानें स्वतःचा पुष्कळ ठिकाणीं उल्लेख केला आहे. निवृत्तिनाथ हे ज्ञानदेवांचे वडील बंधु आणि गुरु होते. ( १८२ ) सांप्रदाई=आपल्या संप्रदायाचा. आपल्या संप्रदायांत याला कसा समाविष्ट करून घ्यावा? बरड=नापीक, खडकाळ. ( १८९ ) मानसपूजा=इष्ट देवतेचें मनोमय पूजन. तुकोबांचे मानसपूजेचे अभंग प्रसिद्ध आहेत. ( १९३ ) अवसरीं=वेळीं. ( १९५ ) कुटिल=वांकडया मनाचा. ( १९६ ) भूदेवा=ब्राह्मणाला. ( १९७ ) पथि-कासी=वाटसरूला, पांथस्थाला. शिरपाव=एक शिरोभूषण. ( १९८ ) जीवन= पाणी. ( २०२ ) जनार्दनाचे=जनार्दनस्वामींच्या. जाणीव=येथें अहंता असा अर्थ. ( १०४ ) फुडी=स्फुट, उघड. येथें चांगली, गोड, असा अर्थ. रोकडी= तत्काळ.

## अध्याय २ रा.

**ओवी** ( १ ) भरतें=भरती. ब्रह्मविद्या=अध्यात्म, वेदांतादि. वासरमणी= सूर्य. ( २ ) शुद्धज्ञान=ईश्वरविषयक ज्ञान, आत्मज्ञान. अवचट=अकस्मात्. मोक्षयुक्तीचें=मुक्ति मिळविण्याच्या मार्गाचें. बीज=रहस्य. ( ३ ) मंत्रराज=सर्व मंत्रांतला प्रमुख मंत्र. दैवदशेनें=सुदैवानें. भक्तकथेसंधीं=साधुसंतांच्या कथा ऐकण्याच्या संधीस. ( ४ ) विवेकवल्ली=पारमार्थिक विवेकरूपी वेल. हरिख=हर्ष. ( ५ ) वैराग्याची निरपेक्षता=वैराग्याच्या योगानें प्राप्त होणारी निरिच्छता. ( ६ ) सायुज्यता=सलोकता, समीपता, सरूपता आणि सायुज्यता असे मुक्तीचे चार प्रकार आहेत, त्यांपैकीं सायुज्यता ही एक मुक्ति. निजधाम=खास वस्तीचें ठिकाण. निर्विकल्प=येथें निःसंशय असा अर्थ. कल्पद्रुम=कल्पवृक्ष. ( ७ ) वाळिला=टाळला, घालवून दिला. तावितां=तापविल्यावर. ( ८ )

डांकलग=सोन्याच्या दागिन्यांतला लाखेचा भाग किंवा त्यांत मिसळलेली हीन धातू. ( ९ ) विरक्त=विरागी. राजमंदिरींचें वर्षासेन=राजाकडून मिळणारी ठराविक वार्षिक रकम. ( १० ) सुगरिणी=सैंपाक करण्यांत कुशाल अशा स्त्रिया. कुचर=न शिजणारा किंवा न फुटणारा दाणा. येथें, अंगचोर. (११) अक्षोक्षज= श्रीविष्णु. साहित्य=पूजेची सामग्री. गरुडध्वजा=श्रीविष्णूला. ( १२ ) या ओवींतील तांतडी आणि लवडसवडी हे दोन्ही शब्द एकाच अर्थाचे आहेत. त्यांचा अर्थ लगबगीनें. ( १३ ) अनंत=विष्णूचें एक नांव. ( १४ ) अंतरसाक्ष=सर्व प्राणिमात्राच्या मनांतलें जाणणारा. चैतन्यघन=चैतन्यरूप; ज्याच्यांत जडत्व नाहीं असा. ( १५ ) ब्राह्मण=भोजन करी निरंतर=एकनाथांच्या घरीं नित्य ब्राह्मणभोजन होत असे. ( १७ ) ब्राह्मणसंतर्पण=समाराधना, ब्राह्मणभोजन. ( १८ ) त्याकारण=त्याला. परिवार=कुटुंबांतील माणसें, स्त्रीपुत्रादि. ( २४ ) पूज्यमान=पूजा करण्यास योग्य, पूजनीय. लीलानाटकी=जगद्रंगभूमीवर आपल्या मायेनें नाना प्रकारचे खेळ करून दाखविणारा. ( २५ ) चोखडी=चांगली, सुंदर. गंगोदकें=गंगेच्या ( येथें गोदावरीच्या; कारण पैठणास गंगा नाहीं, गोदावरी आहे व तिलाहि तिकडे गंगाच म्हणतात. ) पाण्यानें. ( २६ ) शेपशायी=शेपावर निद्रा करणारा. वैकुंठपीठ=येथें विष्णु असा अर्थ. ( २७ ) अष्टांगयोग=योगशास्त्रांत योगाचे आठ प्रकार सांगितले आहेत. जयाकारण=ज्याच्यासाठीं; ज्याची प्राप्ति व्हावी म्हणून. सोज्वळ उटोन=घांसून पुसून स्वच्छ करून. ( २८ ) सायुज्यदानी=मोक्ष देणारा. ( २९ ) विष्णूच्या पायांपासून गंगेचा उगम झाला अशी पौराणिक कथा आहे. ( ३१ ) ओळंगती=हात जोडून पुढें उभ्या असतात. ( ३२ ) दीपक सरसावी= दिव्याची वात सारी. ( ३३ ) सुरगण=सर्व देव. ( ३५ ) श्रीखंड्या ब्राह्मण= एकनाथाचे घरीं भगवान् श्रीविष्णु श्रीखंड्या ब्राह्मणाच्या रूपानें बारा वर्षें नाथांची सेवा करीत राहिले होते अशी कथा आहे. "श्रीएकनाथसदनीं माधवजी सर्व काम हें करितो । स्वकरें चंदन घांशी गंगेचें पाणि कावड्या भरितो" ही आर्या प्रसिद्धच आहे. अद्यापही, पैठण येथें, नाथषष्ठीच्या दिवशीं, एकनाथांच्या घरचा पाण्याचा मोठा रांजण, देवानें गुप्तरूपानें आणलेली घागर त्यांत ओतल्याशिवाय भरत नाहीं असें सांगतात. ( ३६ ) भरोवरी= सारावार, घरकाम. ( ३७ ) कांतेशीं=नाथांची पत्नी गिरिजाबाई हिजबरोबर. ( ३८ ) घुसळण=दहीं घुसळणें. मजकारण=मला. ( ३९ )

( ३९ ) पाकशाळा=स्वयंपाकगृह. साहित्य=जेवणाचें साहित्य. ( ४० ) आडा-आडी=कामाची गर्दी. ( ४१ ) विस्मितमन=आश्चर्यचकित. ( ४२ ) सावडी=उष्टें अन्न व पत्रावळी उचलून टाकणें. ( ४४ ) क्रमोनि=मरून. ( ४५ ) पितृतिथि=वडिलांचा श्राद्धदिन. उदयिक=उद्यां. पितृक्षण=पितृश्राद्धास ब्राह्मण म्हणून जेवावयास येण्याचें आमंत्रण ( ४६ ) पाकनिष्पत्ति=स्वयंपाक. स्नानें सांगितलीं विप्रांसी=स्नान करून या असें ब्राह्मणांस सांगितलें. द्विजांकारणें=ब्राह्मणांसाठीं. ( ४८ ) उपरीवरी=माडीवर, गच्चीवर. ( ४९ ) अनामिक=अस्पृश्य जातीचा मनुष्य, महार. बिदीसी=गल्लींत, बोळांत. ( ५१ ) आपल्या जन्मासी=या जन्मांत. ( ५३ ) संचितीं=नशिबीं. ( ५९ ) बिदीस=घराच्या बाजूच्या बोळांत. ( ६१ ) घृत=तूप. शाका=भाज्या. लवण=मीठ. ( ६२ ) जनीं जनार्दन आहे निश्चित=सर्व जनांच्या ठायीं जनार्दन वास करीत आहे. भोक्ता=भोजन करणारा, भोगणारा. ( ६३ ) त्यांकारणें=त्या अनामिकांना. यथारुचि=आपापल्या आवडीप्रमाणें. ( ६५ ) यातिहीन=हलक्या जातीचे, ज्यांना जात नाहीं असे, चातुर्वर्ण्याबाहेरचे. वैष्णव=विष्णुभक्त. केली आठवण जन्मवरी=आम्हांला जन्मभर आठवण राहील अशी गोष्ट तुम्हीं केली. ( ६६ ) अपेक्षित=इष्ट, आवडतें. ( ६८ ) पाकासि घातल्या स्वयंपाकिणी=सैंपाक करणाऱ्या स्त्रियांस सैंपाक करण्यास सांगितलें. पहिल्याहूनि=पहिल्यानें केलीं होतीं त्यांपेक्षां. दशगुणी=दसपट. ( ७० ) अघटित=विचित्र, लोकविलक्षण. पूर्वीं कधीं कोणी केलें नव्हतें अशा प्रकारचें. (७१) शास्त्रज्ञ=धर्मशास्त्र जाणणारे. (७५) वर्णसंकर=निरनिराळ्या वर्णांचें मिश्रण,सबगोलंकार. (७८) पुनीत=पावन. ( ७९ ) पुरोडाश=यज्ञाहुतीचा अवशेष. वायसापुढें=कावळयापुढें. ( ८० ) भागीरथीची कुपी=गंगेच्या पाण्यानें भरलेली कुपी. बहिर्भूमीसी=शौचाच्या जागीं. जडित भूषण=जडावाचा दागिना, रत्नखचित अलंकार. ( ८१ ) मैलागिरी=मलय पर्वत. मलबारात सह्याद्रिपर्वताचा जो भाग आहे त्याला मलयपर्वत म्हणतात व त्यावर होणाऱ्या चंदनाला मैलागिरी चंदन म्हणतात. हा चंदन उंची समजला जातो. खरासि=गाढवाला. ( ८२ ) अग्नि-होत्रींचा=कांहीं ब्राह्मण घरांत कायमचा अग्नि ठेवून त्याची पूजा करीत असतात त्याला अग्निहोत्र व त्या ब्राह्मणाला अग्निहोत्री म्हणतात. कृशान=अग्नि.सुधारस=अमृत. ( ८४ ) वाळित=बहिष्कार. ( ८५ ) एकनाथाकारण=एकनाथांना.

( ८८ ) आगतं—या. ( ८९ ) पूगीफल=सुपारी. गोपीचंदन=हें एक प्रकारचें खनिज भस्म आहे. त्याचे गोळे करून त्याचा गंधादाखल उपयोग करितात. यज्ञोपवीतें=जानवीं. हिरण्यदक्षिणा=दक्षिणेदाखल सोन्याचीं नाणीं दिलीं. ( ९० ) ब्रह्मार्पण=हें ब्रह्माला म्हणजे परब्रह्म जो परमेश्वर त्याला अर्पण असो. ( ९१ ) जनार्दनपायीं=परमेश्वराच्या पायांच्या ठायीं. येथें एकनाथांचे गुरु जनार्दनस्वामी त्यांच्या पायांच्या ठायीं असाही अर्थ घेतां येईल. पितृस्वरूपीं=पितरांच्या रूपानें. पितृलोक=मृतांचे आत्मे,पितरांचे आत्मे,ज्या लोकीं जातात अशी समजूत आहे तो पितृलोक.असे अनेक लोक आपल्या पुराणांत सांगितले आहेत. (९२ ) पितृपंक्ति= पितरांची पंगत, पंक्तीस बसलेले पितर. ( ९३ ) शेष=शिल्लक. इष्टांसमवेत= आप्त व इष्टमित्र यांच्यासह ( ९४ ) कवाडें=दारें (९५) साक्षात=प्रत्यक्ष. ( ९६ ) मानवी=मनुष्यकोटींतील ( ९७ ) कर्माभिमान=वेदोपदिष्ट कर्ममार्गाचा, कर्मठ-पणाचा अभिमान. निजनिष्ठें=( त्याच्या ) श्रद्धेमुळें.( ९८ ) गरुडध्वज=श्रीविष्णु. ( ९९ ) प्राक्तना=नशिबाला. ( १०० ) उदयिक=उद्यां. नीत=नीति, रीतभात. स्वयातींत असावें=आपल्या जातींत असावें, ज्ञातिबाह्य वर्तन करूं नये. (१०१ ) येरवींच=अकारण, असें कांहीं तरी केल्याशिवाय. ( १०२ ) पाचारिलें=बोला-वलें. ( १०४ ) दूषण=दोष. विधियुक्त=धर्मशास्त्रांत सांगितलेल्या विधीप्रमाणें. ( १०५ ) विपरीत=आपल्या इच्छेविरुद्ध, मताविरुद्ध. ( १०७ ) गंगेंत=येथें गोदावरींत. गोमय=गाईचें शेण. ( १०८ ) त्र्यंबकेश्वर=नासिकापासून थोड्या अंतरावर असलेलें एक क्षेत्र. गोदावरी नदी येथें उगम पावते. बारा ज्योति-र्लिंगांपैकीं त्र्यंबकेश्वर हें एक लिंग आहे. ज्ञानदेवांचे वडील बंधु व गुरु श्री-निवृत्तिनाथ यांची येथें समाधि आहे.(१०९) कुष्ठ=कोड.दुष्ट=कुरूप,किळसवाणें. ( ११० ) पैल=पलीकडे, जवळच. ( ११२ ) उमाकांत=उमा म्ह० पार्वती तिचा पति श्रीशंकर. अनामिक=ज्यांचा नामोच्चार करूं नये असे अस्पृश्य. पितृ-तिथ=पितरांची श्राद्धतिथि. ( ११५ ) धरणें=अमुक एक गोष्ट झाल्याशिवाय मी येथून हालणार नाहीं अशी प्रतिज्ञा करून एखादा मनुष्य बसतो तेव्हां तो धरणें धरून बसला असें म्हणतात. धरणें उठविलें शंकरें=शंकरानें याला कांहीं तरी सांगून वाटेस लावलें; आपल्या देवळाच्या दारांतलें धरणें उठविलें. ( ११६ ) आपैसा=आपोआप. ( ११७ ) कोडी=अंगास कोड फुटलेला मनुष्य. एका अनामिकाचें सुकृत=एका अस्पृश्यास जेऊं

घातल्यामुळें झालेलें पुण्य. ( ११९ ) कांती=तेज, रूप. कोड गेलें. ( १२२ ) विंझणवारा=पंख्याचा वारा. प्रावरण=पांघरूण, आच्छादन, वस्त्र. अंबरा= आकाशाला. वैश्वानरा=अग्नीला. ( १२३ ) पाककरण=शिजविणें. उदधीस= समुद्रास. तीर्थाटन=तीर्थयात्रा करीत फिरणें. आम्हांकारणें=आम्हांला. ( १२४ ) अघटित=न घडणारी, लोकोत्तर. ( १२७ ) निरत=तत्पर, गढलेला. देवतार्चन= देवतेचें पूजन. ( १२९ ) द्वारावती=द्वारकेला. सप्तपुऱ्यांपैकीं एक पुरी. ही काठेवाडांत आहे. अनुतापयुक्ती=पश्चात्तापयुक्त अंतःकरणानें. रुक्मिणीपती= श्रीकृष्ण. ( १३० ) गंगातीरीं प्रतिष्ठानांत=गोदावरीकांठीं पैठणांत. ब्राह्मण-संतर्पण=ब्राह्मणभोजन. ( १३२ ) ब्राम्हणजन=घरकाम करणारा ब्राम्हण, आचारी, शागीर्द. ( १३५ ) ब्राह्मणसेवनीं=ब्राह्मणांची सेवाचाकरी करण्यांत. ( १३६ ) तापसी=तपस्वी. ( १४० ) चक्रपाणि=सुदर्शन चक्र धारण करणारा श्रीविष्णु किंवा कृष्ण. ( १४१ ) ऋणायित=ज्याचें आपण देणें लागतों असा. ( १४४ ) जगन्नाथ=श्रीकृष्ण. ( १४५ ) विलोकीत=पहात. ( १४६ ) लवलाहें= तत्क्षणीं, तावडतोब. ( १४७ ) शोकाकुलित=शोक+आकुल+इत=दुःखी. ( १४८ ) सद्गदित=कंठ भरून येणें. ( १५० ) केशवा=श्रीकृष्णाला. आळवीतसे=विनवी-तसे. ( १५१ ) वृत्तांत=येथें खरा प्रकार असा अर्थ. ( १५२ ) सुकुमार=कोमल, नाजुक. ( १५३ ) नेणवे=कळलें नाहीं. ( १५४ ) पूज्यमान=पूजनीय. सदाशिव= श्रीशंकर. ( १५५ ) वाडकोड=कौतुकानें, उत्कंठेनें. ( १५६ ) लाघव=कौशल्य, माया. पुत्रपणें=आपला म्हणून. लेखीतसे=मानीतसे. ( १६० ) अमर्यादा=अप-मान. ( १६३ ) यामिनींत=रात्रीं.

ज्ञानदेव—महाराष्ट्रांतील सर्वश्रेष्ठ संतकवि. हे सुमारें ६५० वर्षांपूर्वी होऊन गेले. मूळगांव आपेगांव. यांची समाधि आळंदी येथें आहे. निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाई अशीं हीं चार भावंडें होतीं. यांचे वडील विठ्ठलपंत व आई रुक्मिणी. विठ्ठलपंतांनीं विवाहितावस्थेंत संन्यास घेऊन पुनः गृहस्थाश्रम स्वीका-रला म्हणून त्यांचा व त्यांच्या मुलांचा कर्मठ ब्राह्मणांनीं फार छळ केला. हीं चारी भावंडें शेवटपर्यंत अविवाहित होतीं. ज्ञानदेवांस ज्ञानेश्वर असेंही म्हणतात. त्यांनीं आपले बंधु निवृत्तिनाथ यांचा उपदेश घेतला होता. भगवद्गीतेवर त्यांनीं विस्तृत मराठी टीका ओवीबद्ध लिहिली आहे तिचें नांव भावार्थदीपिका, पण ती ज्ञानेश्वरी या नांवानेंच प्रसिद्ध आहे. ज्ञानदेवांनीं आपल्या वयाच्या २२ व्या वर्षी समाधि घेतली. बहुतेक महाराष्ट्र संतकवि यांना गुरुस्थानीं मानतात.

ज्ञानेश्वरीच्या तोलाचा ग्रंथ मराठींत दुसरा नाहीं. हा ग्रंथ ज्ञानदेवांनीं आपल्या वयाच्या १६ व्या वर्षी लिहिला अशी आख्यायिका आहे. 'अमृतानुभव' या नांवाचा त्यांचा दुसरा ग्रंथ आहे तो निव्वळ तत्त्वज्ञानपर असून समजण्यास फार कठिण आहे. (१६४) अलकावती=आळंदी. पुण्यापासून हें स्थान १६ मैलांवर इंद्रायणीतीरीं असून तेथें ज्ञानदेवांची समाधि आहे. अजानवृक्ष=वृक्ष-विशेष. हा वृक्ष फक्त आळंदी येथेंच ज्ञानदेवांच्या समाधीपाशीं आहे असें म्हणतात. अजानवृक्षाची मुळी जाण । सन्निध येऊन लागली=अजानवृक्षाची मुळी समाधींत येऊन अंगाला लागली. (१६६) सिद्धेश्वराचें=आळंदी येथील क्षेत्रदेवतेचें. (१६७) वज्रासन=आसनमांडी. ज्ञानराज=ज्ञानदेव. (१६९) ते निजकरें लावूनि एकीकडे=ती मुळी आपल्या हातानें बाजूस सारून. (१७०) तेव्हां=त्या काळीं. (१७१) पाल=लहान तंबू. व्यवसायी=व्यापारी. (१७६) पाठमोरे होतां ब्राह्मणांसी=ब्राह्मण मागें फिरताच. (१८१) जनार्दन-स्वरूप त्रिजगतीं=सर्व विश्वांत एक परमात्मा भरला आहे अशी भावना. (१८४) कर्पूर=कापूर. द्रवत्व=पातळपणा. नीरासी=पाण्याला. मकरंद=फुलां-तला मध.

## श्रीतुकारामचरित्र

तुकारामाइतका प्रसिद्ध व लोकप्रिय साधुकवि महाराष्ट्रांत दुसरा झाला नाहीं. पुण्यानजीक इंद्रायणीतीरीं देहू नामक गांव आहे तेथें सुमारें २७५ वर्षांपूर्वी तुकाराममहाराज होऊन गेले. यांची जात कुणबी. धंदा व्यापारउदीम. आडनांव आंबळे. यांचे आईबाप लहानपणींच वारले व वडील बंधु घर सोडून कायमचा देशांतरास गेला. आरंभीं तुकोबांचा व्यापार व संसार बरा चालला, पण पुढें त्यांचें दिवाळें निघालें व दुष्काळांत त्यांची पहिली बायको वारली. एक मुलगाही वारला. दुसरी बायको फार कजाग निघाली. संसार सांवरण्याचा बुवांनीं पुष्कळ प्रयत्न केला, पण त्यास यश आलें नाहीं. ते दरिद्री झाल्यामुळें गांवांतले लोक त्यांचा उपहास करूं लागले. शेवटीं बुवा दैववादी बनले आणि विरक्त होऊन परमार्थमार्गास लागले. गांवानजीकच्या डोंगरावर जाऊन तेथें परमार्थसाधन करण्यांत आपला काल व्यतीत करण्यास त्यांनीं सुरुवात केली. त्यांचा धाकटा भाऊ कान्होबा विभक्त झाला. आपल्या वांट्याचे देण्याघेण्यासंबंधाचे कागदपत्र बुवांनीं इंद्रायणींत बुडविले.

पूर्वजांनीं बांधलेलें विठोबाचें देऊळ जीर्ण झालें होतें त्याचा त्यांनीं उद्धार केला. अनेक वर्षें एकांतभजन केल्यावर बुवांस दृष्टांत झाला व बाबाजी चैतन्य नामक एका मृत सत्पुरुषानें त्यांस स्वप्नांत उपदेश दिला. पुढें त्यांना कवित्व-स्फूर्ति झाली. बुवांनीं आपलें शेष आयुष्य कथाकीर्तन व अभंगलेखन यांच्या द्वारें महाराष्ट्रांत शुद्ध भागवतधर्माचा प्रसार करण्यांत घालविलें. रामेश्वरभट्ट नामक एका विद्वान् ब्राह्मणानें तुकोबांनीं आपले अभंग इंद्रायणींत बुडवावे अशी आज्ञा केली तेव्हां ती आज्ञा मान्य करून बुवांनीं आपल्या अभंगांच्या वह्या स्वहस्तें इंद्रायणीच्या डोहांत बुडविल्या, परन्तु पांडुरंगाच्या कृपेनें, तेरा दिवसांनीं त्या वह्या पाण्यावर तरंगूं लागल्या व अशा रीतीनें त्यांच्या अभंगाचें रक्षण झालें. पुढें तेच रामेश्वरभट्ट बुवांचे टाळकरी झाले! श्रीसमर्थ रामदास, छत्रपति शिवाजी महाराज वगैरे थोर पुरुष बुवांचे समकालीन होते. फाल्गुन वद्य २ सोमवार शके १५७३ या दिवशीं बुवा इंद्रायणीतीरीं कीर्तन करीत असतां अकस्मात् अदृश्य झाले. त्यांचें कलेवर सांपडलें नाहीं, यामुळें ते विमानांत बसून सदेह वैकुंठास गेले अशी दंतकथा प्रचालित झाली. तुकोबांचे सुमारें चार पांच हजार अभंग उपलब्ध आहेत. त्यांची वाणी फार प्रेमळ व अत्यंत परिणामकारक असून स्थलविशेषीं फार जोरदार व कठोरही आहे. त्यांची कविता इतकी लोकप्रिय आहे कीं, पट्टीच्या विद्वान् हरिदासाचेंही कीर्तन त्यांच्या अभंगावांचून सुरू व्हावयाचें नाहीं व 'हेंचि दान दे गा देवा' हा त्यांचा अभंग म्हटल्याशिवाय पुरें व्हावयाचें नाहीं. तुकोबांइतका लोकप्रिय संतकवि महाराष्ट्रांत दुसरा झाला नाहीं. त्यांचे वंशज अद्याप देहू येथें आहेत.

## टीपा व शब्दार्थ अध्याय १ ला.

**(ओवी १ ली)** आनंदघन=आनंदाचा मेघ. राजीवनयन=कमलनेत्र, कमलासारखे सुंदर ज्याचे डोळे आहेत असा. विधिजनक=ब्रह्मदेवाचा बाप. दानवभंजन=दनूचे पुत्र ते दानव म्हणजे राक्षस, त्यांचा नायनाट करणारा. (२) सज्जनजीवन=साधुसंतांचें केवळ जीवनच असा. निर्गुणसगुण=येरवीं निर्गुण, पण अवतार घेतो तेव्हां सगुण. अतर्क्यगती वेदशास्त्रां=तुझी लीला वेदांना आणि शास्त्रांना अगम्य आहे. (३) अपरिमिता=मोजतां न येण्यासारखा, अमर्याद. विश्वचक्षूनें तूं देखता=विश्वांतील प्राण्यांचें जितके डोळे आहेत तितक्या डोळ्यांनीं पाहणारा. निगम=श्रुति, वेद. (४) चित्स्वरूप=

चैतन्यरूप, चिदानंदरूप. गुणनिधान=सर्व गुणांचा ठेवा. (५) नेति नेति= तें नव्हे, तें नव्हे. (७) आटणी=आटाआटी, ओढाताण. योगसाधन फार कठिण आहे, त्यासाठीं देहास फार कष्ट द्यावे लागतात. त्यांसी नेणतां= त्यांजकडे लक्ष न देतां. (८) सनकादिकांसी=शुक, सनक, सनंदन हे मोठे भागवत होऊन गेले. (११२) अभक्त=भक्ति न करणारे. येथें दुर्जन असा अर्थ. ११३ ते १२० या ओव्यांचा अर्थ अगदीं सुलभ आहे. त्यांत कठिण शब्द फारसे नाहींत व रचनाही साधी आहे. (२१) रामदास=प्रसिद्ध साधु श्रीसमर्थ रामदास. हे तुकोबांचे समकालीन होते. ज्या भक्तविजय ग्रंथांतून हें तुकारामचरित्र उतरून घेतलें आहे त्याच्या ४७ व्या अध्यायांत रामदासचरित्रांतील कांहीं कथा महीपतींनीं दिल्या आहेत व त्यापुढील ४८ व्या अध्यायांत तुकारामचरित्राचा प्रारंभ झाला आहे. जाहले रामराव निजांगें=पांडुरंगानें रामाचें रूप धारण करून रामदासांस दर्शन दिलें. (२२) धरणीं=महीतलावर. (२३) व्यवसाय=व्यापार. (२४) विदेहवृत्ति=देहानें बाह्यतः प्रांपचिक व्यवसाय करीत असतांही, मन परमार्थांत गढलेलें असणें, अंतर्मुखता. (२५) क्रमलियावर= मृत्यु पावल्यावर. दुःखरूप=दुःखानें भरलेला. (२६) भरतें=समुद्राच्या भरतीचें पाणी. वर्षाऋतु=पर्जन्यकाल. अभ्र=मेघपटल. शीतकालीं=हिंवाळ्यांत. (२७) हरपती=लोपतात. (२७) उष्णकाळ=उन्हाळा. तृणें=सर्व प्रकारचें गवत. (२९) स्वदेशीं=येथें महाराष्ट्रांत असा अर्थ. आटोनी=संपून. (३०) ज्येष्ठ कांतेसी=पहिल्या बायकोस. कनिष्ठेसी=दुसरीस, दुसऱ्या बायकोस. संतान=मूलबाळ, संतति. कण=धान्याचा कण. (३१) निवर्तली=मरण पावली. अन्न अन्न करितां=अन्नान्नदशा होऊन, उपास पडून. तेणें लज्जित होऊनि चित्ता। प्रपंचममता नाठवे=त्यामुळें (पहिली बायको अन्न अन्न करून मेली त्यामुळें तुकोबांच्या) मनाला मोठी लाज वाटली. स्त्रीला अन्न देऊन तिचा जीव आपणास वांचवितां आला नाहीं, या विचारानें ते लज्जायमान झाले व त्यांची संसारावरील आसक्ति उडाली. संसाराचा त्यांना वीट आला. (३२) हरपतां= नष्ट होतां. त्यांसवेंच गेला सन्मान=(संपत्ति आणि वैभव नष्ट होतांच) त्यांच्याबरोबरच समाजांत मिळणारा मानसन्मानही नष्ट झाला. (३४) विलासी जन=सुखेच्छु लोक, (वृक्षाच्या छायेंत बसून) चैन करूं इच्छिणारे लोक. (३५) देहलोभी=देहाचा लोभ धरणारे, मरणास भिणारे. रण टाकूनि पळती=

युद्धांत पाठ दाखवून पळून जातात. ( ३७ ) उदिमाची हातवटी=व्यापार-धंद्याचा उपक्रम. तुटी=नुकसान, तोटा. ( ३८ ) प्रपंच लटिका मिथ्या माया= संसार हा खोटा, केवळ माया आहे. नाशवंत=नष्ट होणारी. ( ३९ ) ढेंकुणांचे बाजे=ढेंकणांनीं भरलेल्या खाटेवर. ( ४० ) वांझेचा पुत्र=वेदांतपरिभाषेंतील 'वंध्यापुत्र'. वांझेला पुत्र होणार कसा ? व जर झाला तर ती वांझ कशी ? अर्थात् वंध्यापुत्र म्हणजे नसलेली वस्तु. हरिख=आनंद. सरसीं=सारखीं, समान. ( ४२ ) पुरातन=जुन्या काळीं बांधलेलें. निजांगें=स्वतःच्या आंगमेहनतीनें. सोज्वल=सुंदर, नव्यासारखें. ( ४४ ) निजमतें=आपणास येईल तसें, आपल्या स्वतःच्या पद्धतीप्रमाणें. आधीं=पूर्वी, आरंभीं. धरावें ध्रुवपद त्यांमागें=त्यांच्या-( कीर्तनकारांच्या ) मागें उभें राहून त्यांची साथ करावी. ( ४५ ) वचन= उक्ति, निवडक कविता. ( ४६ ) भूतमात्रासि=प्राणिमात्रास. त्यासी परोपरी काया कष्टी। संतप्त पोटीं निववीत=प्राणिमात्राच्या सुखासाठीं आपला देह परोपरीनें झिजवी; संताप पावलेल्यांचें समाधान करी. ( ४६ ) मथितार्थी= थोडक्यांत, सारांशरूपानें. ( ५१ ) पीडित=आजारी, रोगी. ( ५२ ) वृषभांसी= बैलांस. मोकलूनि देती=सोडून देतात. ( ५४ ) शारीर तप=शरीर झिजवून केलेलें तप. शारीरिक तप, मानसिक तप, वाचिक तप, असे तपाचे प्रकार आहेत. प्राकृतमती=प्राकृत भाषेंत, मराठींत. (५५) निरूपणासरिसें=सांगण्याच्या ओघांत. दृष्टांतीं=हा शब्द येथें निरर्थक आहे. दृष्टांतीं आलें अनायासें=सहज आठवण झाली. कथानक=गोष्ट, कथा. ( ५६ ) नामा=नामदेव. हे थोर संत ज्ञानदेवांचे समकालीन होते. महाराष्ट्र संतमंडळांत यांची योग्यता फार मोठी आहे. यांचे सुमारें २००० अभंग गाथ्यांत दिले आहेत. यांची वाणी फार प्रेमळ आणि परिणामकारक आहे. यांचे गुरु विसोबा खेचर. प्रसिद्ध संतकवयित्री जनी ही यांची दासी होती. शतकोटी कवित्व=अशी आख्यायिका आहे कीं, वाल्मीकींनीं शंभर कोटी श्लोकांचा रामायण ग्रंथ रचिला ही गोष्ट एकदां नामदेवांनीं ऐकली तेव्हां त्यांनीं स्वतः शंभर कोटि अभंग रचून ईश्वराची स्तुति करण्याची प्रतिज्ञा केली. ( ५७ ) कलीमाजी आयुष्य वर्षें शत=कलियुगांत शंभर वर्षें मनुष्याचें आयुष्य. आघात=अपमृत्यु वगैरे. (५९) तुझ्या आश्रयें=तुझ्या कृपेच्या जोरावर, तुझ्या भरंवशावर. निजांगें=स्वतः. पण=प्रतिज्ञा. तूं काय एक न करिसी देवा= देवा, तुला कोणती गोष्ट करतां येत नाहीं ? तुला अशक्य काय आहे ? केवा= येथें पाड असा अर्थ. ( ६० ) करुणाउत्तर=नम्रपणाचें वचन, दया येईल असें

भाषण. शार्ङ्गधर=पांडुरंग, विष्णु. शार्ङ्ग नांवाचें धनुष्य धारण करणारा. काय आज्ञापी=काय आज्ञा करिता झाला? (सरस्वतीस काय आज्ञा केली?) (६१) जिव्हाग्रीं=(नामदेवांच्या) जिभेच्या टोंकावर. कुसरी=कौशल्ययुक्त, सुंदर, कलाकुसरीचें. श्रुतीचे गर्भ आहेत अंतरीं=वेदांच्या अंतरंगांत जे गूढ अर्थ भरले आहेत ते. प्राकृत वैखरी=मराठी भाषेंत. (६२) ब्रह्मतनया=ब्रह्मदेवाची कन्या सरस्वती. प्रसादवाणी=प्रासादिक कविता. याचा चपळत्वें लिहिणार कोणी। चक्रपाणी योजावा=नामदेवांच्या मस्तकावर तुझा वरदहस्त असल्यामुळें ते अतिशय जलद कविता रचतील, तरी ती तितकीच जलद लिहून घेणाऱ्या एकाद्या लेखकाची, हे देवा, या कामीं तूं योजना कर. ६३व्या ओवीचा अर्थ=नामदेवांच्या मुखांतून जे शब्द बाहेर पडतील ते तत्काळ लिहून घेतले पाहिजेत, कारण, पुनः तेच शब्द उच्चारावयास जर त्यांना सांगितलें तर ते त्यांना उच्चारतां येणार नाहींत. (६४) घननीळ=मेघांसारखा नीलवर्ण आहे ज्याचा तो, पांडुरंग. (६६) व्यासवाल्मीकादिक=व्यास हे महर्षि पराशरापासून मत्स्यगंधेच्या पोटीं जन्म पावले. इतिहासपुराणादि ग्रंथांचे कर्ते. यांची विद्वत्ता एवढी मोठी होती कीं "व्यासोच्छिष्टं जगत् सर्वं' अशी म्हणच पडली आहे. वाल्मीकि=हे आरंभीं वाटमारेपणाचा धंदा करणारे कोळी होते. नारदांच्या उपदेशामुळें यांना पश्चात्ताप होऊन रामनामाच्या जपामुळें हे पुढें महर्षि झाले. रामायण ग्रंथाचे कर्ते. रामचंद्रानें सीतेचा त्याग केला त्या वेळीं यांनींच तिचा प्रतिपाल केला. यांना आदिकवि म्हणतात. (६७) वैकुंठभुवन=विष्णूचें वास्तव्यस्थान. शेषशयन=शेषाच्या पाठीवर निजणें. (६८) अवधान=लक्ष. (७०) ललित=हा एक कवित्वाचा प्रकार आहे. वेदांतांतील कोड्यांवर केलेली कूट कविता. ललित म्हणून जो एक नाट्यप्रकार आहे त्यांत असली कविता म्हटली जाते व म्हणून तिला ललित म्हणतात. एकनाथकृत हमामा, हुंबरी, एडका, अर्जदास्त, थट्टा, वगैरे पद्यें प्रसिद्ध आहेत, त्यांस भारूड असें म्हणतात व तेंच ललित होय. नामदेवाच्या नांवावर प्रसिद्ध असलेलें एक ललित येथें देतों:—

आम्ही न बोलों लटकें। अवघें वर्तमान खोटें॥ध्रुव०॥ मुंगी व्याली शिंगी झाली तिचें दूध किती। अठरा रांजण भरुन ठेविले प्याले बारा हत्ती॥ १॥ तळयांत कांसव गीत गाय ताडिवर कोल्हा नाचे। घेउनि कागद दौत लेखणी खेंकडा पुस्तक वाचे॥२॥ विष्णुदास नामा म्हणे ऐका याची ख्याती। जो लटकें म्हणेल

त्याचे पूर्वज नरकीं जाती ॥ ३ ॥ ( ७२ ) निगमा=वेदाला. म्हणे कांहीं प्रेमा राहिला पोटीं। तो पुढें गोष्टी वदवीन=शतकोटी अभंग रचण्याची प्रतिज्ञा नामदेवांनीं केली होती, ती अपुरी राहिली. कांहीं अभंग कमी पडले. देव नामदेवांस म्हणाला, " कांहीं अभंग रचावयाचे राहिले, ते मी पुढें करवीन. " हे अभंग पुढें देवानें तुकोबांच्या मुखानें वदविले व शतकोटि संख्या पुरी केली अशी आख्यायिका आहे. ( ७५ ) वाउगें=भलतेंच, विपयास धरून नसलेलें. ममाज्ञा=माझी आज्ञा किंवा माझ्या आज्ञेनें. ( ७६ ) प्रमाणाची=ठरलेली, निश्चित, संकल्पित. ( ७८ ) वैखरी=वाणी. ( ८० ) प्रमाण=मान्य, सिद्धांतरूप. ( ८३ ) भविष्य केलें रामायण=पुढें होणारें रामचरित्र अगोदरच रामायणांत ग्रथित केलें. ( ८४ ) लीला दाविली तैशाच रीती=वाल्मीकींनीं अगोदरच भविष्य करून ठेविलें होतें त्याप्रमाणें वर्तन करून रामानें तें भविष्य खरें करून दाखविलें. ( ८५ ) धृतराष्ट्र=कौरवांचा पिता व पांडवांचा चुलता. संजय= या नांवाचे अनेक पुरुष इतिहास-पुराणांत उल्लेखिले आहेत. या ठिकाणीं, धृतराष्ट्रास कौरव-पांडवांच्या युद्धाचा वृत्तांत सांगणारा सजय. ( ८६ ) एवं= याप्रमाणें. ( ८७ ) डुडुळ=घुबड, पिंगळा. जल्पती=वल्गना करितात. येथें ओरडतात. ( ८७ ) तस्करांसी=चोरांना. ( ८८ ) दातयाची=दात्याची, दान करणाराची. कृपण=कद्रू, कवडीचुंबक. ( ८९ ) अजापाळ=धनगर. ( ९० ) धुंगळवेल=एक घाणेरडी वेल. हिचा पाला चुरगळला असतां एक प्रकारचा दुर्गंध येतो. ( ९१ ) अविंध=यवन, मुसलमान. ( ९५ ) शिवाजी नृपति= स्वराज्यसंस्थापक छत्रपति शिवाजीमहाराज. ( ९६ ) सिंहगड=पुण्यापासून थोड्या अंतरावर असलेला एक जुनाट डोंगरी किल्ला. पूर्वी याचें नांव 'कोंडाणा' असें होतें. शिवाजीचा सरदार तानाजी मालुसरे व त्याचा भाऊ सूर्याजी यांनीं छापा घालून मोंगलांपासून हा किल्ला घेतला. या युद्धांत तानाजी मारला गेला, त्याला अनुलक्षून महाराजांनीं " गड आला पण सिंह गेला ' असे उद्गार काढले, तेव्हांपासून या किल्ल्याचें नांव 'सिंहगड असें पडलें. ( १०० ) होन=त्यावेळीं चालू असलेलें ३॥ रु. किंमतीचें सोन्याचे नाणें. ( १०२ ) प्रपंचहेवा=संसाराची आवड. ( १०३ ) जोहारियाच्या=रत्नपारख्याच्या. साटोवाटी=परीक्षेसाठीं. गारा=एक प्रकारचा चकाकणारा दगड. कनकओंटी=सोन्यानें भरलेली ओंटी. ( २०७ ) सुखसंपन्न=सुखी. येर=दुसरी. ( १०८ ) तुळसी=तुळसीची माळ. वारकरी लोक गळयांत तुळसीची माळ

घालीत असतात. ( १०९ ) धणीवरी=आमचें समाधान होईल इतकी. ( ११० ) निरपेक्ष=कोणत्याही वस्तूची अपेक्षा न करणारी. ( १११ ) चाकणाहून= पुण्याहून थोड्या अंतरावर हें गांव असून तेथें किल्ला आहे. शिवाजीच्या वेळीं येथें मुसलमानाच्या सैन्याची छावणी होती. ( ११५ ) परचक्रें=शत्रुसैन्यानें. ( ११७ ) दुश्चित=चिंताग्रस्त. काय गुजगुज करितां मनांत=मनांतल्या-मनांत किंवा आपापसांत हळूहळू काय बोलतां ? ( १२० ) सर्वथा=कधींही, काय वाटेल तें झालें तरी. ( १२१ ) एकचित्तीं=एकाग्र मन करून, कीर्तनाकडे सर्व लक्ष लावून. ( १२३ ) परदळ=शत्रुसैनिक. ( १२४ ) आम्हांकारण= आम्हांला. ( १२५ ) पायिक=सेवक. ( १२७ ) अंतरसाक्ष=जगांत कोठें काय चाललें आहे हें मनांतल्या मनांत ज्याला समजतें तो. ( १२८ ) अरिष्ट=संकट. ( १३१) जातिपरंपरा=संतांच्या जातीची परंपरा. दुसऱ्याचें दुःख पाहून स्वतः दुःखी होणें ही परंपरा. विक्षेप=अंतराय. ( १३४ ) अश्वारूढ होऊन= घोड्यावर बसून. ( १३६ ) नृपनाथ=शिवाजीमहाराज. ( १३८ ) उठाउठी=त्वरेनें, लगबगीनें. माळवदीं=माळरानांत. ( १४२ ) हडबड= धांदल, उतावीळ. ( १५४ ) भ्याडां=भित्र्यांना. ( १४५ ) कासया वागवितां हतियार=हातांत शस्त्र कशाला बाळगतां ? ( १४८ ) आंतुडेना=सांपडेना, हातीं लागेना. ( १५० ) कंटकवन=काटेरी झाडांचें बन. ( १५२ ) तरळली दृष्टी=दृष्टिभ्रम झाला. ( १५३ ) निशापती=चंद्र. ( १५६ ) हिंव सुटलें=थंडी पडली. ( १५८ ) कांटवणीं=कांट्यांच्या झाडांस अडकून. १५९ ते १६६ या आठ ओव्या अगदीं सोप्या आहेत. ( १६७ ) तुम्हां-ऐसाचि=तुमच्यासारखाच. ( १६९ ) चमत्कारला=आश्चर्यचकित झाला. नामापासून क्रियापदें तयार करण्याची कांहीं जुन्या कवींची चाल आहे. मुक्तेश्वरी कवितेंत अशीं क्रियापदें बरींच सांपडतात. चक्रपाणी कृपाळें= दयाळू भगवंतानें. ( १७१ ) दीनरूप=दरिद्र्याचा वेष. राजान्न=राजा या नात्यानें मी दिलेलें धनधान्य. ( १७२ ) वृषभावरी=बैलाच्या पाठीवर. ( १७३ ) यामिनी=रात्र. वृंदावनीं=तुलसीवृंदावनाजवळ. स्मरणी=जपमाळ. ( १७६ ) परी=प्रकार. १७७ व्या ओवीचा अर्थ=तुम्ही शिवाजी राजे आहांत हें मी ओळखलें असें जर आपण त्यांना सांगितलें तर मजवरील त्यांच्या प्रेमांत अंतर पडेल, असा विचार करून तुकोबा कांहीं न बोलतां मनांतल्या मनांत नामस्मरण करीत राहिले. ( १७८ ) खंडेल सुकृत आपुलें=आपलें पुण्य

कमी होईल. ( १७९ ) त्यांजकारणें=त्यांना. ( १८० ) करंटी=कपाळफुटकी, दुर्दैवी. ( १८१ ) अवचित=अकस्मात्. (१८१) द्विजवरां=ब्राह्मणांना. ( १८२ ) संचित=नशीब, ( सांठविलेलें. ) ( १८४ ) अंबर=आकाश. तटस्थ=तन्मय. हरिलीला=हरिकीर्तन. ( १८५ ) व्यथा=व्याधि, रोग. ( १८६ ) नायकोनी=न ऐकतां. ( १८८ ) मायालोभासी सांडविलें=मायामयता नाहींशी करून टाकलीस. ( १८९ ) नाहीं धारजिण हरिनाम=ईश्वराचें नामस्मरण आम्हाला मानवत नाहीं. (१९० ) उद्धत=उद्धट, उर्मटपणाचें. ( १९१ ) भणंग=भिकारी. रंग समस्त वितुळला=रंगाचा बेरंग झाला. ( १९२ ) कुणप=प्रेत. मृतसंजीवनी=मेलेल्यास जिवंत करण्याची विद्या. (१९३) सुधारस=अमृत. ( १९४ ) लाघव=चमत्कार. ( १९६ ) ब्रह्म=परब्रह्म, परमेश्वराचें विश्वव्यापी निराकार स्वरूप. मुसावोनी= सोनार मुशींत सोनें टाकून त्याचा रस करतो, त्याप्रमाणें ( हरिनामस्मरणाच्या ध्वनीमुळें ) ब्रह्म गगन भरून कोंदलें. ( २०० ) सावाचित्त=येथें सजीव असा अर्थ.

## अध्याय २ रा.

( **ओवी १ ली** ) सगुणस्वरूप=ईश्वर निराकार व निर्गुण आहे, परंतु आपल्या भक्तांसाठीं कधीं कधीं तो साकार व सगुण होतो, असें हिंदु धर्माचें एक तत्त्व आहे. ( २ ) वक्षस्थळा=छातीवर. रत्नकळा=रत्नांची प्रभा. ( ३ ) कनकदीतीं=सोन्याप्रमाणें देदीप्यमान्, कांतिमान्, तेजस्वी. तळपती=झगमगतात, शोभतात. मकराकृति=सुसरीच्या आकाराचीं सुढाळ=तेजस्वी. ( ४ ) कौस्तुभ=विष्णूच्या गळ्यांतला मणि. ( ५ ) वोळीनें=ओळीनें, रांगेनें. क्षुद्रघंटी= लहान घंटा. ( ६ ) तुजकारण=तुला. ( ८ ) दासांकारण=भक्तांना. ( ९ ) लौकिक स्थिति=सांसारिक उठाठेवी. ( ११ ) देहलोभ=देहाची ममता. चहूंमुक्ति= सलोकता, समीपता, सरूपता, सायुज्यता या चार मुक्ति. ( १३ ) बौद्धावतार= ज्या अवतारांत देवानें मौन धारण केलें असून तो कोणत्याही प्रकारची हालचाल करीत नाहीं तो अवतार. ( १४ ) जैसी सांजवेळ न होतां पाहें=संध्याकाळ झाली नसतां म्हणजे वासरास दूध पाजण्याची वेळ झाली नसतां. वत्स= वासरूं. मोहें=वात्सल्यानें, अपत्यप्रेमानें. ( १७ ) घेतली आळी=आळ घेतली, हट्ट धरला. ( १९ ) श्रीकृष्ण बालपणीं गोकुळांत असतां, इंद्रानें एकदां खूप पर्जन्य पाडून गोकुळ बुडविण्याचा प्रयत्न केला त्या वेळीं श्रीकृष्णानें गोवर्धन पर्वत बोटावर उचलून गोकुळाचें रक्षण केलें अशी कथा आहे. बुझावण=

समजूत. ( २१ ) अटक=अडचण, अडणें. येथें विस्मृति असाही अर्थ होईल. ( २४ ) बुद्धिप्रकाशक=बुद्धीला प्रकाश देणारा, बुद्धिदाता. बडिवार=बडेजाव, मोठेपणा. ( २५ ) दांभिक=ढोंगीपणाची. श्वानविष्ठा=कुत्र्याचा मल. सन्मान-चेष्टा=मानसन्मानाच्या गोष्टी. ( २६ ) जेणें लोक पिशाच म्हणती=ज्या प्रकारचें वर्तन केलें असतां लोक आपणास पिशाच म्हणतील. कुटिल=कुटाळ, टवाळ-खोर. विदेहस्थिति=देहाकडे दुर्लक्ष. 'देही असून विदेही' असे कांहीं लोक असतात ते बाह्यतः देहधर्माप्रमाणें सर्व प्रकारचीं कर्में करीत असतांही, आंत-रतः, आपण देही नाहीं असें समजून वागत असतात. रामाचा सासरा राजा जनक हा 'विदेही जनक' म्हणून प्रसिद्ध आहे. ( २८ ) विवेकें रसना आवरीत=विचारानें जीभ ताब्यांत ठेवी. जिव्हालौल्य सोडून दिलें होतें. ( २९ ) देहनिर्वाहापुरतें=देहधारणास, जीवरक्षणास पुरेल इतकें. ( ३० ) बल्लाळाच्या वनाआंत=देहूजवळ बल्लाळाचें वन या नांवाचें एक ठिकाण आहे त्यांत. ( ३१ ) निजमंदिरीं=आपल्या घरीं. ( ३२ ) साजणी=मैत्रिणींनो. मात=गोष्ट. परत=चौकशी, वास्तपुस्त. ( ३७ ) कुंभांत=मातीच्या घागरींत. जीवन=पाणी. ( ३७ ) लवलाहें=त्वरेनें. ( ४० ) धायी मोकलितें=ढसढसा रडतें. ४१ व्या ओवीचा अर्थ=हे ऐकून तुकोबा आपच्या पत्नीस म्हणाले, तुझ्या आईबापांनीं माझ्याबरोबर तुझें लग्न लावून दिले त्यापूर्वीं त्यांनीं, आपल्या मुलीला हा नवरा योग्य आहे कीं नाहीं, याचा विचार केला नाहीं. मग मी तुला अन्नवस्त्र कशासाठीं पुरवूं ? ( ३२ ) येरू=( दुसरा ) तुकोबा. निरविलें=स्वाधीन केलें, सोंपवून दिलें. ( ४४ ) विश्वजननी=विश्वाची माता, जगन्माता. ४५ व्या ओवीचा अर्थ–सृष्टि निर्माण झाली त्या वेळीं जन्म पावून तीं वाढलेलीं नाहींत ( म्हणजे सृष्टयुत्पत्तीपूर्वींच तीं होतीं ) व या विश्वाचा जेव्हां नाश होईल तेव्हां तीं नष्ट होणार नाहींत. ( ४६ ) घटांत=मातीच्या भांड्यांत. त्यास नाहीं दुजेपण=घटांतलें आकाश आणि घराबाहेरचें आकाश हीं भिन्न नाहींत. घटाकारण=घटाचा. घट फुटला म्हणून घटांतलें आकाशही फुटलें असें म्हणूं नये. ( ४८ ) पिशुनासी होईल उजगरा=निंदा करणाऱ्या सोयऱ्याधायऱ्यांची खोड मोडेल, त्यांचीं तोंडें बंद होतील. ( ५० ) भाक=वचन. ( ५२ ) वरपडा होऊन=स्वाधीन होऊन, आहारीं जाऊन. येथें हा शब्द महीपतींनीं चुकीनें उपयोजिला आहे. त्याचा खरा अर्थ जोरावर, विजयी, असा आहे. ( ५३ ) जाहलें यथास्थित=योग्यच

झालें. आपंगिलें=जवळ केलें, आपली म्हटलें. ( ५४ ) गिरिकपाटीं= पर्वताच्या गुहेंत. (५६) हरिदिनी=एकादशी. (५७) या ओवींत ज्या ११ अभंगांचा उल्लेख आहे ते अभंग जिज्ञासूंनीं तुकारामबुवांच्या गाथ्यांत पहावे. ( ५८ ) आर्षवाणी=आर्ष शब्दाचा मूळ अर्थ वैदिक, पवित्र असा आहे. परंतु महीपतींनीं तो शब्द येथें बालवाणी, बोबडे बोल, वेडेवांकडे शब्द या अर्थी योजिला आहे. जैसें देखावया वासरमणी। दीपक उजळोनी दाखविती= ज्याप्रमाणें सूर्य दाखविण्यासाठीं दिवा लावावा, त्याप्रमाणें. अमृतासिद्धि=ज्या सिद्धीच्या योगानें अमरत्व प्राप्त होतें ती सिद्धि. ( ६२ ) क्षेत्र=शेत. दारुण= पुष्कळ. निजभाग्यें=आपल्या दैवयोगानें. ( ६३ ) काबाड=ओझें, भार. ( ६४ ) देणें लागतो याचा सारा=या शेताचा कर द्यावा लागतो. काळोजी=यम. हुद्देदार= अधिकारी. ( ६५ ) ऐवज=तारण. वृंदावन=एक अतिशय कडू फळ. बकुळ-सुमन=बकुळीचें फूल. चौधरी=गांवकामगार. हृदयचोहटां=हृदयरूपी चावडींत. ( ७२ ) शेखीं=शेवटीं. निकी=दृढ, निश्चित. निष्कळंकी=कलंकरहित, कर्जमुक्त. ( ७४ ) याजभेणें=याच्या भयानें. (७५) गव्हाण=शेत. कुळवाडी केली नसती= शेत खंडानें केलें नसतें. ( ७६ ) बेबाक होऊन=सर्व बाकी चुकती करून. ( ७७ ) सूती=लागवडीची जबाबदारी. ( ७३ ) सोये=तजवीज. ६२ ते ८८ या ओव्यांचा सारांश:—मग बायकोला समोर बसवून तुकोबा तिला म्हणाले, "हा मनुष्यदेह म्हणजे एक शेत आहे. नरदेहीं येऊन जर प्रभूचें नामस्मरण केलें तर या शेतांत भरपूर पीक येईल. ज्यांनीं खरें परमार्थसाधन केलें नाहीं त्यांना या शेतीत तूट मात्र आली. प्रपंचाचें ओझें वाहून त्यांनीं आपला देह व्यर्थ झिजविला. या शेताचा जो मालक आहे त्याला ८० टक्के सारा द्यावा लागतो. तो जर दिला नाहीं तर ( त्याचा ) जप्तीदार यम हा मोठा दरारा दाखवितो. त्याच्या भयानें ८० पैकीं १० टक्के फेडून टाकले. बाकी ७० टक्के उरले त्याबद्दल तारण देण्यास कांहीं नाहीं. १० टक्के फेडले ते कोणते असें तूं विचारशील, तर देहरूप शेतांतली जीं दहा इंद्रियें त्यांची मी झाडणी केली. शिवीगाळ आणि स्तुतीचे गोड शब्द हीं दोन्ही माझ्या कानास सारखींच वाटतात. सोनें आणि माती हीं डोळ्यांस समान वाटतात. साखर आणि कडू वृंदावन यांच्या चवींतला फरक माझ्या जिभेस कळत नाहीं. घाणेरडी पुंगळवेल आणि सुवासिक बकुलपुष्प यांचा गंध माझ्या नाकास सारखाच वाटतो. सर्व इंद्रियांत चंचळ असें जें मन तें विठ्ठलाच्या पायांपाशीं स्थिर झालें

असून, हस्तपादादि कर्मेंद्रियांनीं आपल्या कर्तेपणाचा अहंकार सोडून दिला आहे. ज्या इंद्रियाचा जो विषय आहे तो जर त्याला कळत नाहीं तर तीं झडून गेलीं असेंच म्हटलें पाहिजे. बाकी जे सत्तर टक्के उरले त्यांना मजपाशीं काय तारण आहे हें सांगतों. पांडुरंग हा येथला चौधरी (पाटील) आहे. तो म्हणतो, सगळी बाकी फेडून टाका. हृदयरूपी चावडीवर (चोहटा=चव्हाटा) बसून काय बोलतो तें ऐक. तो म्हणतो, शेवटीं घरांतलीं भांडींकुंडीं व गुरेंढोरें देऊन आपली बाकी फेडून टाक; व तसा दृढनिश्चय करून ऋणमुक्त हो. ह्या वस्तु जर याला आम्ही दिल्या नाहींत तर आपणास लपावयास जागा कोठें आहे? कारण हा जेथें नाहीं असें एकही रिकामें स्थल नाहीं. विवेकपूर्ण मनानें याचा विचार कर. हा परमात्मा सर्व विश्व व्यापून उरला आहे, याच्या भयानें जर आपण पळून गेलों तर आपल्याला पाठीशीं घालील असा कोणी दिसत नाहीं. तें शेत तरी केवढें मोठें? हिंडावयाचें तरी किती? (येथें लक्षचौऱ्याशींचा फेरा ध्वनित आहे.) याच्या सेवकांनीं आमची अगदीं पाठ पुरविली आहे. मी जर याचें शेत खंडानें मुळीं केलेंच नसतें तर मला यानें कशाला गांजलें असतें? म्हणून, याची सर्व बाकी चुकती करून आपण येथेंच राहूं व तो आपखुषीनें जी काय मजुरी देईल तिच्यावर सर्वांचा निर्वाह चालवूं. यानें आजपर्यंत किती तरी लोकांची नागवण केली असून त्यांनीं कांहीं पुनः संसार पाहिला नाहीं (म्हणजे ते मुक्त झाले.) या भयानें लागवड करण्याची जबाबदारी कोणी घेत नाहीं. कोणाला सद्गुरु जामीन राहिला त्याचें निसंतान झालें (पक्षीं तो वैरागी झाला). त्यानें मानापमान गुंडाळून ठेवला त्यामुळें लोक त्याला हांसूं लागले. जवळ असलेले जे कोणी कसोटीस उतरले त्यांना हा वैकुंठांत नेऊन घालतो (मुक्ति देतो). माझीही त्यानें अशीच पाठ पुरविली आणि मला नकोनकोसें केलें. मला ही गोष्ट पूर्वींच ठाऊक असूनही मी नेणता झालों (आणि) ज्यानें निर्दयपणानें पुष्कळांचा छळ केला त्याच्या हातीं सांपडलों. तूं आतां मनांत विचार करून संसाराविषयीं उदासीन हो. माझ्या जीविताचा नाश होण्याचा प्रसंग आल्यावर आतां अनमान कशाला करावयाचें? ही गोष्ट आवश्यक आहे असें सहजासहजीं दिसून आल्यावर ती तुला कां आवडत नाहीं सांग बरें? मला उपास पडूं लागले, आतां लाज कशाला धरावयाची? देहाचा लोभ धरल्यावर तुझ्या जिवाचें काय

होईल ? माझी आणि तुझी ताटातूट कधींही होणार नाहीं अशी तजवीज तुला सांगतों. जेणेंकरून मुलांबाळांसह आपण एकत्र नांदूं, असा विचार मी तुला सांगतों तो जर निश्चयपूर्वक ऐकशील तर आपला वियोग होणार नाहीं. तूं म्हणशील, मुलेंबाळें काय खातील ? तर ही चिंता बिलकुल करूं नकोस. त्यांचें अन्नवस्त्र विधीनें त्यांच्या नशिबीं लिहिलें आहे. तूं आपला गळा सोडवून घे, लक्षचौऱ्यांशीं योनी चुकव, गर्भवासाचें दुःख टाळ. हें कसें करावयाचें तें मी तुला सांगतों, ऐक. मी तुला टाकून पळून जातों; कारण, जवळ ऐवज असला म्हणजे ( चोर ) गळा धरतात. तूं माझ्याजवळ असलीस म्हणजे ( चोर ) घाला घालतील. यमधर्माच्या दूतांचा मार फार भयंकर आहे. तो पाहून जीव थरथर कांपूं लागतो. आतां जर तुला माझी चाड असली तर तूं सर्वस्वी ( जिवावर ) उदार हो." ( ८७ ) मुजाईम=अडथळा, हरकत. ( ९० ) मोकळा=उघडउघड. ( ९१ ) जेवाया देवें लाविलें पान=देवानें पानावर जेवणें भाग पाडलें. वाड=मोठें. ( ९३ ) बरग=गुरांचा एक रोग. कठिण अंतर करावें=मन कठोर करावें, मुलांबाळाचा मोह सोडावा. ( ९४ ) निरसोनियां आस=आशा सोडून. उपमा समान वज्र जैसें। धैर्य चित्तास करावें=वज्राप्रमाणें मन घट्ट करावें. ( ९५ ) परमानंदधणी= परम आनंदाची ( ब्रह्मानंदाची ) जोड. सनकादिक=सनक, सनंदन वगैरे मोठे विष्णुभक्त होऊन गेले ते. ( ९६ ) सोहळे=कौतुक, उत्सव. ( ९७ ) जडित=रत्नखचित. ( ९९ ) मायबाप=भगवान् विष्णु, परमात्मा. ( १०२ ) पाचारीं=बोलाव. ( १०३ ) विधियुक्तीं=शास्त्रोक्त विधीप्रमाणें. द्विजांहातीं= ब्राह्मणांकडून. ( ११० ) मजकारण=माझ्याकडून. ( ११३ ) अतीत=अतिथि. ( ११५ ) अनुसंधान=संदर्भ. ( ११८ ) मिष=निमित्त. ( ११९ ) आर्ती= दुःख, पीडा. ( १२० ) अर्थ नाहीं कोणासी वंचिला=अर्थ कोणापासून चोरून ठेवला नाहीं. ( १२५ ) जटिल=जटाधारी. ( १२७ ) चवदा रत्नें वांटिते वेळ। शंकरासी लाधलें हलाहल=देव आणि दैत्य यांनीं मिळून समुद्रमंथन केलें तेव्हां त्यांतून चौदा रत्नें निघालीं. त्यांपैकीं हलाहल नामक भयंकर विष कोणीच घेईना, तें शंकरांनीं घेतलें अशी कथा आहे. ( १३३ ) वाडियामागून=वाड्याच्या मागील बाजूस. ( १३४ ) घातलें पाणी संसारा=संसारावर पाणी सोडलें. ( १३८ ) त्रिविध=तीन प्रकारचे. ( १४० ) समयीं=वेळच्या वेळीं, योग्य वेळीं. ( १४४ ) यापरी काळ कडे लागतां=या

प्रमाणें काळ कंठीत असतां. ( १४७ ) पायांनीं=पांडुरंगाच्या पायांनीं, ( त्याचें चरणस्मरण केलें म्हणून ) १५० ) महाद्वार=पंढरपुरांतील पांडुरंगाच्या मंदिराचा मुख्य दरवाजा. ( १५२ ) मत्स्यरूप धरूनी=शंखासुर नामक दैत्यानें ब्रह्मदेवाचे वेद चोरून नेले म्हणून विष्णूनें मत्स्यावतार धारण करून शंखासुराचा वध केला व वेद ब्रह्मदेवास परत आणून दिले अशी कथा आहे. ( १५३ ) कूर्म होऊनि=देवानें कासवाचें रूप धरून पृथ्वी पाठीवर घेतली अशी कथा आहे. ( १५४ ) वराहावतारीं विष्णूनें वराहाचें रूप धारण करून हिरण्याक्ष नांवाचा दैत्य मारला व दाढेवर पृथ्वी धरली अशी कथा आहे. ( १५५ ) हिरण्यकशिपु नामक दैत्यानें, प्रल्हाद नामक आपल्या विष्णुभक्त पुत्राचा छळ केला तेव्हां विष्णूनें नरसिंहरूप धारण करून त्या दैत्यास मारलें अशी कथा आहे. ( १५६ ) दानाभिमानें=मी मोठा दाता या अभिमानानें. बळी=हा दैत्य मोठा हरिभक्त होता, पण त्याला आपल्या दातृत्वाचा फार गर्व झाला होता, म्हणून विष्णूनें वामनावतार घेऊन त्याच्या गर्वाचा परिहार केला व त्याला पाताळात घातलें अशी कथा आहे. ( १५७ ) रेणुकेच्या उदरासी येऊनी=रेणुका ही जमदग्नि ऋषीची पत्नी. तिच्या पोटीं जन्म पावलेल्या परशुरामानें एकवीस वेळ निःक्षत्रिय पृथ्वी केली अशी कथा आहे. ( १५८ ) दशकंठ=दहा तोंडाचा रावण. रघुनंदनें=श्रीरामानें. ( १९० ) घर्में=घामानें. ( १६१ ) जे=कीं. ( १६४ ) आपुलें तें स्वाधीन नसे जाण=( तूं पळून जावें म्हणून सांगतेस पण ) तें आपल्या स्वाधीन नाहीं ( कारण मी भक्तांचा अंकित आहें ). ( १६५ ) थोकलाचि=थबकलेला. ( १६६ ) मिलिंद=भुंगा. ( १७१ ) मजकारण=मला. ( १७५ ) विनीत=विनम्रपणाचें. या चरणांत नम्र आणि विनीत हे एकाच अर्थाचे दोन शब्द कवीनें वापरले आहेत. ( १७७ ) पहिलें=पूर्वी, अगोदर. ( १७८ ) आता आश्रय जाहला कोणता=आतां कशामुळें धीर आला ? ( १८३ ) विरोधभक्ति=हा एक भक्तीचा प्रकार आहे. देवाला नेहमीं विरोध करावयाचा. रावण, शिशुपाल, वगैरे पुराणपुरुष देवाचे विरोधी भक्त होते व म्हणूनच देवानें त्यांना स्वहस्तें मारून मुक्ति दिली अशी समजूत आहे. ( १८६ ) भास्कर=सूर्य. ( १८८ ) पाषाण ठेविला मस्तकावरुता=डोक्यावर दगड घेऊन. ( १८९ ) अंतरीं=देवालयांत. ( १९४ ) उजगरा=जागरण. ( १९५ ) अपंगी=आश्रय देई. ( १९८ ) ठायें=वस्तु. संसारसोये मोडिली=संसाराची

वाताहत झाली. ( २०० ) मात=गोष्ट. ( २०४ ) मुद्रांकित=( त्याची ) मुद्रा धारण करणारा, अंकित.

## अध्याय २ रा.

( **ओवी १ ली** ) भवभंजना=संसाराचें भय दूर करणाऱ्या. सायुज्यदानी= सायुज्यमुक्ति देणारा. कर्मापासूनी=कर्मबंधापासून. ( २ ) निरपेक्ष=कशाचीही अपेक्षा नाहीं अशी वृत्ति. ( ५ ) लोकाचारी=लौकिकांत, जनांत. ( ६ ) अंतर=मन. ( ७ ) हस्त इच्छिती तुझें अर्चन=तुझें पूजन करावें असें हात इच्छितात. ( ८ ) समदृष्टीनें=समभावानें; एकाच भावनेनें. चराचरभूतीं=चर ( चालणारें ) आणि अचर ( स्थिर ) भूतांच्या ठायीं. ( ११ ) अघटित= विचित्र. निरूपण=प्रवचन, कथाभाग, ग्रंथरचना. ( १४ ) परिधान करूनि दिव्यांबर=( रुक्मिणीनें दिलेलें ) दिव्य वस्त्र नेसून. ( १६ ) राशीस येतसे उणेंपणा=धान्याच्या राशींत उणेंपणा येतो, धान्य कमी मिळतें. नवनीत=लोणी. ( १८ ) काचमणियाचा=कांचेच्या मण्याचा. मुक्ताफळ=मोतीं. ( १९ ) खद्योत= काजवा. वासरमणी=सूर्य. थिल्लर=डबकें. पयोब्धि=क्षीरसागर. ( २० ) गुंजाहार= गुंजांची माळ. वाडेंकोडें=कौतुकानें, आवडीनें. अनर्घ्य=अमोलिक. सुधारस= अमृत. ( २१ ) सिद्धि=योगाभ्यासादिकांमुळें मनुष्यास कांहीं सिद्धि प्राप्त होतात. अलौकिक गोष्टी करून दाखविण्याचें सामर्थ्य. कल्पतरु=ज्या वृक्षाखालीं बसलें असतां इच्छित वस्तु प्राप्त होतात असा एक काल्पनिक वृक्ष; कल्पवृक्ष. दुर्जन- त्यागें भेटती सद्गुरु । तरी कां न अव्हेरू करावा=दुर्जनांचा संग सोडला असतां जर सद्गुरु भेटतात तर दुर्जनांचा अव्हेर कां करूं नये ? ( २२ ) सायुज्य- सदन=वैकुंठ, मुक्ति. ( २३ ) दृष्टांतवचनें=निरानिराळे दृष्टांत देऊन केलेलें भाषण. ( २६ ) देवांसी=देव आडनांवाच्या सत्पुरुषास. तुकोबांचे कालीं पुण्यानजीक चिंचवड येथें चिंतामणि देव या नांवाचे प्रसिद्ध गाणपत्य ( गणपतीचे उपासक ) रहात होते. त्यांचे वडील मोरया देव देही मोठे गाणपत्य व प्रसिद्ध पुरुष होते. हें घराणें अद्याप चिंचवड येथें असून, तेथें प्रतिवर्षी मोठी यात्रा भरते. देवस्थानचें उत्पन्नही मोठें आहे. गणपति प्रसन्न केला=गणपति प्रसन्न करून घेतला. ( २७ ) शूद्रवाणी=तुकोबा जातीनें शूद्र असून वाण्याचा धंदा करीत असत. ( २८ ) प्रचीत=अनुभव. ( ३० ) मूषकवाहनाची=चिंचवड येथील गणेशमूर्तीची. निकटीं देवांचे=चिंता-

माणि देवांजवळ. ( ३३ ) वैष्णव भक्त=विष्णुभक्त तुकोबा. सांगाती=संवगडी, सोबती. ( ३४ ) गजवदनासी=गणपतीला. ( ३५ ) आमचे मंत्र आम्हांस फळले=आमच्यावर बाजू उलटली. आपल्या सिद्धीचा चमत्कार तुकोबांस दाखवून त्यांना लाजवावें, चकित करावें, म्हणून त्यांना आम्हीं बोलावणें पाठविलें, पण तेच आतां आम्हांस गणपतीचें आवाहन करून त्याला आणण्यास सांगत आहेत व त्याप्रमाणें आम्हीं केलें नाहीं म्हणजे आमच्यावर बाजू उलटणार. तयासी=गणेशमूर्तीला. ( ३६ ) शास्त्रयुक्ति=शास्त्रज्ञान. ( ३७ ) दुश्चित=शुद्ध नव्हे तें; एकाग्र नसलेलें. ( ३८ ) गजेंद्र=पुराणांत उल्लेखिलेला एक हत्ती. हा एकदां तलावांत जलक्रीडा करीत असतां त्याला एका मगरानें धरलें. त्याच्या हातून सुटण्याचा त्यानें पुष्कळ प्रयत्न केला परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. तेव्हां त्यानें विष्णूचा धांवा केला व विष्णूनें येऊन त्याला सोडविलें, अशी कथा आहे. हें ‘ गजेंद्रमोक्ष ’ आख्यान प्रसिद्ध आहे. गोपी=गोकुळांतील गवळ्यांच्या स्त्रिया. ( ३९ ) विधियुक्त याज्ञिक कर्मठपण=वेदांत सांगितलेल्या विधीप्रमाणें यज्ञकर्म, व कर्मठपणा. ऋषिपत्न्या=एकदां श्रीकृष्ण गोपालांसह गाई चारीत चारीत दूर अरण्यांत ऋषींच्या आश्रमाजवळ गेला असतां, सर्वांस भूक लागली म्हणून ऋषींकडे त्यानें अन्न मागण्यास गोपाळ पाठविले, पण त्यांनीं अन्न दिलें नाहीं. पण त्यांच्या स्त्रियांनीं मात्र श्रीकृष्ण व गोपाल यांस स्वतः अन्न नेऊन दिलें. ( ४० ) हुंबली=शीळ, हुंकार. (४४) एकदंताचें=गणपतीचें. विनायक=गणपतीचें एक नांव. ( ४५ ) मुहूर्त=घटकाभर. ३॥ घटका म्हणजे एक मुहूर्त, परंतु तो अर्थ येथें नाहीं. ( ४७ ) उदकें भरूनी निथळत=सगळें अंग पाण्यानें भिजल्यामुळें पाणी गळत आहे अशी. ( ४८ ) क्षार=खारट. समुद्रजीवन=समुद्राचें पाणी. ( ४९ ) किमर्थ=कोणत्या कारणानें, कसा. ( ५० ) त्याकारण=त्याला. ( ५३ ) सकळ देवतांची गति। आलीसे हातीं यास्तव=( यानें पांडुरंगास वश करून घेतलें असल्यामुळें ) सर्व देवता याच्या अंकित झाल्या आहेत. ( ५६ ) ओळंगती=वश होतात. रोहिणीपतीतें=चंद्राला. उडुगण=नक्षत्रें. ( ६१ ) तांडव=एक प्रकारचें नृत्य. उमावरा=शंकराला. न समाये=मावत नाहीं. ( ६२ ) दिठी=दृष्टीनें. फांसोटी=पाश, फांस. भवबंध=संसाराचें बंधन. ( ६६ ) तुजकारण=तुला. ( ६५ ) देवांसी=चिंतामणि देवांना. ( ६६ ) लंबोदर=गणपति. ( ६८ ) पयोब्धी=क्षीरसागर. सरितांचा=नद्यांचा. ( ७० ) हटीं=हटयोगानें. ( ७५ ) ग्रामासमीप=( देहू गांवानजीक )

मळियांत=मळ्यांत. ( ७८ ) चवाळें=घोंगडीची चौघडी. ( ७९ ) इक्षुदंड= ऊस. मध्यकांडी=उसाचें मधलें कांडें. ( ८० ) ब्रह्मरस चाखिला=ब्रह्मानंदाची गोडी घेतली. इतर=इतर रस. सर्वथा=अगदीं, बिलकुल. दीपक=दिवे. ( ८१ ) सिद्धांतज्ञानीं=वेदांताच्या अभ्यासांत, अध्यात्म=शास्त्रांत. पाखंड=नास्तिकपणाच्या गोष्टी. अजापालन=शेळीचें पाळण. (८२) नामसुधेची=हरिनामामृताची. अनावडी=अप्रियता, कंटाळा. ( ८३ ) उटोन=घांसून स्वच्छ करून. ( ८५ ) आकळून=आवळून. ( ८६ ) देहूस प्रवेशतां तुकयास=तुकोबा देहू गांवांत प्रवेशतांच. परावें=दुसऱ्याचें. आपुलें परावें=आपपर. ( ८७ ) तस्कर=चोर. ( ८८ ) चूतवृक्ष=आंब्याचें झाड. ( ८९ ) उर्वी=पृथ्वी. वारण=हत्ती. ( ९३ ) सम्यक=या शद्बाचा मूळ अर्थ खरें, बिनचूक, असा आहे, पण येथें 'समोर' असा अर्थ घ्यावा. ( ९७ ) नेटका=यथायोग्य, बरोबर. ( १०२ ) एकादश स्कंध=अठरा पुराणांपैकीं भागवतनामक पुराणाचें अकरावें प्रकरण. उद्धव=एक यादव. हा श्रीकृष्णाचा मित्र आणि भक्त होता. कृष्णानें त्याला जो उपदेश केला तो भागवताच्या अकराव्या स्कंधांत सांगितला आहे. कदर्यु=लोकांनीं केलेला छळ शांतपणानें सोसणारा एक पुराणपुरुष. याची कथा भागवताच्या अकराव्या स्कंधांत दिली आहे. एकनाथाचे टीकेवरूनी=एकनाथांनीं एकादशस्कंधावर वितृत मराठी ओवीबद्ध टीका केली आहे ती वाचून. या ग्रंथास 'एकनाथी भागवत' असें म्हणतात. ( १०४ ) जे=कीं. संन्यासग्रहण=कदर्यूनें संन्यास घेतल्यावर तो फार शांत झाला व लोकांनीं केलेला छळ त्यानें शांततापूर्वक निमूटपणें सोसला; पण तुकोबा संन्यासी नव्हते, गृहस्थ होते. म्हणून दोघांच्या शांततेची तुलना करणें बरोबर नाहीं असें महीपति म्हणतात. म्हणजे त्यांच्या मतें तुकोबांची मनःशांति कदर्यूच्या मनःशांतीहून श्रेष्ठ प्रीतीची. ( १०६ ) रत्नाकर=समुद्र. ( १०७ ) सायुज्यतेचे साम्यतेसी निश्चितीं । सलोकता समीपता न सरती=सायुज्य मुक्तीशीं सलोकता व समीपता यांची बरोबरी होणार नाहीं. कारण, सायुज्यता म्हणजे ईश्वराशीं एकरूपता पावणें; सलोकता म्हणजे वैकुंठलोकीं वास करणें व समीपता म्हणजे ईश्वराच्या सन्निध असणें. ( ८ ) ओवीचा अर्थ=ज्या तुकोबांनीं या कलियुगांत सदेह वैकुंठास जाऊन तेथें ध्वज उभारला ते प्रेमळ भक्त वैष्णव–श्रेष्ठ तुकोबा म्हणजे प्रत्यक्ष जगद्गुरूचाच अवतार होय. तुकोबा सदेह वैकुंठास गेले ही आख्याइका प्रसिद्धच आहे. ९ व्या ओवीचा अर्थ=त्याला ( तुकोबाला )

पुनःपुनः थोर थोर म्हणण्यांत अर्थ काय? म्हणून तुकोबा वरिष्ठ, तुकोबा वरिष्ठ असें म्हणूच नये. समुद्राला गंभीर म्हटलें तरच तो गंभीर, येरवीं काय गंभीर नाहीं? ( ११ ) क्षमा=क्षमाशीलता, सहनशीलता. ( पृथ्वी क्षमाशील आहे असें म्हटलें म्हणजेच ती क्षमाशील होते काय? नाहीं; ती स्वभावतःच क्षमाशील आहे. ) ( ११२ ) लेणें=अलंकार.(११३) कायिक वाचिक मानसिक= देहानें, वाणीनें व मनानें घडणारें तप. ( ११६ ) चरणचाली=पायांनीं चालून, कोणत्याही वाहनाचा उपयोग न करितां. ( ११९ ) शीतज्वर=थंडीताप. ( १२२ ) अन्वय=अर्थ. ( १२६ ) सत्कीर्तिवैभव=सत्कीर्तिरूप संपत्ति. ( १२७ ) आपैसीं=आपोआप. ( १२८ ) विठाबाई=विठ्ठलास संतांनीं लाडिकपणानें दिलेलें स्त्रीवाचक नांव. आंदण्या=आंदण दिल्याप्रमाणें. ( १२९ ) छंदें=तन्मयतेनें, आनंदभरानें. ( १३० ) मूळ=बोलावणें. ( १३१ ) म्हणोनि उदास धरिलें मज=म्हणून माझ्याविषयीं उदासीन झालास, मजकडे दुर्लक्ष केलेंस, माझी उपेक्षा केलीस. मोकलिलें=त्याग केला,टाकून दिलें. ( १३३ ) सांकडें=संकट. सांड=त्याग. ( १३५ ) भागशीण=शीणभाग, श्रम. ( १३७ ) वाडेंकोडें=अचूक. ( १३९ ) डोळेभेट=दर्शन. वेंच=भार. ( १४० ) कडे लावूं आपुला काळ= आयुष्याचे दिवस घालवूं; कालक्रमणा करूं. ( १४६ ) व्यवसायांत=व्यापार-उदीमांत. तुटी=तूट, तोटा. ( १४७ ) ऋणकरी=येथें धनको असा अर्थ. ( १४९ ) संचिली=सांठविली. आटाआटी=ओढाताण, उपद्व्याप. ( १५० ) कोणाकारण=कोणाला. ( १५३ ) उरी=बाकी. ( तुझी चांगली खरडपट्टी काढीन, कांहीं बाकी ठेवणार नाहीं. ) ( १५८ ) उद्विग्न=येथें उत्कंठित असा अर्थ. ( १५९ ) आडाआडी=आडाआड ( प्रपंचाच्या उठाठेवी ). बराडी=अधाशी. तांतडी=त्वरित. ( १६६ ) अर्थ=तेथें ( पंढरपुरांत ) तुझ्या मंदिराच्या मुख्य दरवाजाची दगडी पायरी जशी निश्चल पडली आहे, तसा माझा ( पायरीप्रमाणें जमिनीवर निश्चल पडून घातलेला ) दंडवत संत तुला सांगतील. ( १६९ ) माझी तुम्ही करा विनवणी=माझ्या वतीनें पांडुरंगाची विनवणी करा. ( १७१ ) विटेवरी न दिसती समचरणें=विटेवर उभा असलेल्या पांडुरंगाचे समचरण तुक्याच्या दृष्टीला कां पडत नाहींत? त्याजकारणें=त्याला. ( १७२ ) ठेच=पढरीला. (१७३)त्रिविध ताप=तीन प्रकारचीं दुःखें. आधिदैविक,आधिभौतिक आणि आध्यात्मिक असे तीन प्रकारचे ताप आहेत. गुणचरित्रें=भगवंताच्या गुणांचें वर्णन, हरिगुणगायन. ( १७५ ) उगाणा=फेड, बेबाक ( पापाचें निर्मू-

लन करून ). ( १७८ ) वर्णावयास नाहीं रसना=वर्णन करण्यास माझी वाणी समर्थ नाहीं. ( १८१ ) दांतकसाळी=शाप ( माझा शब्द तुला बाधेल. ) पोरवडें=पोरकेपण. ( १८४ ) वटवटी=बडबड. ( १८९ ) पत्रिकेचे अभंग=ज्या तुकोबांच्या अभंगांच्या आधारानें या ओंव्या महीपतींनीं लिहिल्या आहेत ते अभंग तुकोबांच्या गाथ्यांत " स्वामींनीं पंढरीनाथास वारकऱ्यांबरोबर पत्र पाठविलें " ह्या मथळ्याखालीं दिले आहेत, ते जिज्ञासूंनीं तेथें पहावे. ( तुकारामाचा गाथा, निर्णयसागर प्रत, पृष्ठ ८६३ ) मूळ अभंग फार सुंदर आहेत, त्यांच्याशीं महीपतींच्या ओंव्याची तुलना करितां, त्या जरा नीरस वाटतात. संकलित=मिळविलेलें, बेरीज, जमा केलेलें. ( १९० ) गभस्ती=सूर्य. ( १९५ ) तुकासी=बरोबरीस, तुलनेस. वैखरी=वाणी. ( १९९ ) अवधान=लक्ष, एकाग्रता.

## अध्याय ४ था.

**ओंवी १ ली. सप्रेम भक्तहृदयनिवासा**=प्रेमळ भक्तांच्या हृदयांत वास करणाऱ्या. ( २ ) गुणनिधाना=गुणभांडारा. यादवराया=यदूपासून झालेले ते यादव. यादवश्रेष्ठा. समुद्रतनया=लक्ष्मी. समुद्रमंथनाचे वेळीं समुद्रांतून जीं चौदा रत्नें निघालीं त्यांपैकीं लक्ष्मी हें एक रत्न होय. म्हणून तिला समुद्रतनया—समुद्राची मुलगी—म्हटलें आहे. ( ८ ) ( ३ ) अंतरसाक्ष=प्रत्येकाच्या मनांतलें जाणणारा. पुंडलीकवरदा=फार जुन्या काळीं दिंडीरवनांत पुंडलीक या नांवाचा एक मनुष्य रहात असे तो इतका स्त्रीलंपट होता कीं तिच्या नादानें तो आपल्या आईबापांचा अतिशय छळ करी. पुढें कांहीं कारणानें त्यास अनुताप होऊन तो मनोभावेंकरून आईबापांची सेवा करूं लागला. तेव्हां त्याला दर्शन देण्यासाठीं स्वतः देव त्याच्या आश्रमाच्या दारांत येऊन उभा राहिला. आईबापांच्या सेवेंत गुंतलेल्या पुंडलीकानें, तेथें एक वीट पडली होती ती भिरकाविली आणि देवास त्या विटेवर उभे राहण्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्या विटेवर पांडुरंग अद्याप उभा आहे, अशी कथा आहे. 'विटेवरी उभा कटावरी हात' इत्यादि शेंकडों अभंगांत या विटेचा उल्लेख संतांनीं केला आहे. पुंडलिकास वर देणारा तो पुंडलीकवरद. पुंडलीकवरदा हरिविठ्ठल ही वारकऱ्यांची घोषणा प्रसिद्धच आहे. ( ४ ) विराटस्वरूप वामनमूर्ति=सर्व विश्व व्यापून उरणारा आणि एखाद्या लहान मुलाएवढा दिसणारा. येथें विरोधाभास अलंकार आहे.

विप्रांप्रती स्थापिलें=ब्राह्मणांची स्थापना--वसाहत-केली. (५) असुरदमना= राक्षसांना दमविणाऱ्या. धर्मस्थापका=धर्माची स्थापना करणाऱ्या. " धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगेयुगे " या गीतावचनावर येथें कटाक्ष आहे. विधिजनका=ब्रह्मदेवाच्या पित्या. ब्रह्मदेव हा विष्णूचा पुत्र. (८) वंदोनी नमावीं सर्व भूतें । तरी गुणदोष आठवत अंतरीं=सर्व भूतांस समभावाने वंदन करावें, तर प्रत्येकाचे गुणदोष लक्षांत येतात (त्यामुळें समभाव टिकत नाहीं.) वंदोनी नमावीं हे एकाच अर्थाचे दोन शब्द योजल्यामुळें येथें पुनरुक्तिदोष झाला आहे. (९) संसारभ्रांति=संसाराचा भ्रम, संसाराची आवड. (१०) बुद्धीसी नावरे चंचल मन=चंचळ मन बुद्धीला आवरत नाहीं. बुद्धीच्या कह्यांत रहात नाही. स्वरूपानुसंधान=तुझ्या स्वरूपावरील लक्ष. (१५) स्वानंदलहरी=आत्मानंदाच्या लाटा, ब्रह्मानंदाचे कल्लोल. (१८) चंद्रभागेचे तीरीं=पंढरपुरास भीमा नदी आहे, तेथें तिला चंद्रभागा म्हणतात. (१९) क्षेत्रप्रदक्षिणा=पंढरपुर नगराभोंवतीं प्रदक्षिणा. (२०) गरुडपार= पंढरपुरांतील पांडुरंगाच्या देवालयांतलें एक स्थल. (२२) सावकाश=स्वास्थ्य. पारधीफांसीं=पारध्यानें लावलेल्या जाळयांत. (२४) जळदेवता=पाण्यांत वास करणाऱ्या देवता. अर्थात् त्या काल्पनिक. वनदेवता त्याच वर्गांतल्या. शेषशायी= शेषाच्या पाठीवर शयन करणारा विष्णु. (२५) पाळती लावी=डोळा ठेवी, पाळत ठेवी. (२८) यासी विचार करावा कवण=या बाबतींत कोणता विचार करावा. तुजकारण=तुला. (२९) गरुडास मूळ पाठवावें. तुकोबांस आणण्यासाठीं गरुडास पाठवावें. (३०) विनतासुत=गरुड, वैनतेय. विनता ही गरुडाची आई. (३३) कैलास=शिवलोक, शंकराचें वास्तव्यस्थान. कैलास या नांवाचें हिमालयाचें एक शिखर आहे तेथें शंकर राहतो अशी समजूत आहे. (४१) अपांपती=समुद्र. ओत=ओहोळ, ओढे. (४२) मैलागिरीनें=चंदनानें. कांटवण= कांटेरी झाडें. (चंदनाच्या झाडाशेजारीं असलेले बोरीबाभळीसारखे कांटेतरूदेखील सुगंधित होतात) (४३) वाचस्पतीनें=देवांचा गुरु जो बृहस्पति त्यानें. (४५) खगपती=पक्ष्यांचा राजा गरुड. पवनचाली=वायुवेगानें. (४६) निढळावरी=ललाटावर. पाणी=हात. (४७) चातक=पक्षीविशेष. याला पृथ्वीवरील पाणी पितां येत नाहीं, म्हणून तो वरून पडणारें पावसाचें पाणी, तोंड वर करून, वरच्यावर पितो अशी समजूत आहे. " घनांबु न पडे मुखीं उघडिल्याविना पांखरें " (केकावलि, मोरोपंत.) कांसव विलोकीत जननीसी=

कांसवी आपल्या पिलांना पाजीत नाहीं. तिनें प्रेमळ दृष्टीनें त्यांजकडे पाहिलें म्हणजे त्यांची भूक निवते, अशी समजूत आहे. येथें, आपली भूक भागविण्यासाठीं कांसवीचें पिल्लूं तिच्याकडे पाहतें असें महीपतींनीं म्हटलें आहे. ( ४८ ) मीनाचें=माशाचें. ( ५३ ) दुर्धर=भयंकर, अनिवार. निर्धार=खरोखर. ( ५४ ) विष्णुवाहन=विष्णूचें वाहन गरुड. ( ५५ ) तृषाक्रांत=तहानेनें व्याकुळ झालेला. ( ५८ ) सजल जाहले=पाण्यानें भरून आले. ( ५९ ) अंडराज+गरुड. वास्तविक येथें ‘ अंडजराज ’ असें पाहिजे. अंडज म्हणजे पक्षी; पक्ष्यांचा राजा गरुड. ( ६१ ) नंदिग्रामीं बैसला भरत=श्रीराम वनवासास जावयास निघाले त्या वेळीं त्यांचा बंधु भरत हा नंदिग्रामांत, आपल्या मामाच्या घरीं, होता. राम वनवासास निघून जातांच त्यांच्या वियोगानें त्यांचा पिता राजा दशरथ हा मृत्यु पावला. तेव्हां, कुलगुरु वसिष्टांनीं भरतास नंदिग्रामाहून अयोध्येस आणविलें. रामास परत आणण्यासाठीं भरत गेला असतां, रामांनीं त्याची समजूत घालून व “ मी वनवासाहून परत येईपर्यंत माझ्या नांवानें तूं राज्य चालव ” असें सांगून त्यास परत पाठविलें. भरतानें रामाच्या पादुका सिंहासनावर स्थापून त्याच्या नांवानें राज्य चालविलें व स्वतः अयोध्येंत न राहतां, नंदिग्रामीं जाऊन वास्तव्य केलें व तेथें तो रामाच्या आगमनाची वाट पहात बसला. अंजनीसुत=अंजनीचा पुत्र मारुती. ( ६२ ) खगेश्वरें=गरुडानें. खग म्हणजे पक्षी, त्यांचा ईश्वर म्हणजे राजा गरुड. अंतर=मन. जाहलें स्थिर=समाधान पावलें. ( ६३ ) मधुरोत्तरीं=गोड शब्दांनीं. ( ३६ ) पूज्यमान=पूजनीय, वंद्य. सुजाण=सुज्ञ. विचक्षण=निपुण, कुशल, दूरदर्शी. ( ६७ ) वाळे नेपुरें बांधितां शिरीं=वाळे, नूपुर हे पायांत घालण्याचे दागिने जर डोक्यांत घातले तर तें हास्यास्पद दिसेल. ( ६८ ) प्रतिमास्थानीं=मूर्तींच्या ठिकाणीं. हडपी=वारा घालणारा. ( ७१ ) अजित=अजिंक्य. जितोनी=जिंकून. भक्तिबलानें वश करून घेऊन. ( ७७ ) हिंवसली=खट्टू झाली. ( ८४ ) आषाढी एकादशीस पंढरपुरांत मोठी यात्रा भरते त्या वेळीं तेथें जे अनेक उत्सव होतात त्यांपैकीं एक. ८६ व्या ओवींत ज्या पांच पुरुषांचीं नांवें आलीं आहेत ते त्या वेळचे प्रसिद्ध संत होत. त्यांपैकीं शेख महमद हे धर्मानें मुसलमान असून त्यांनीं ‘ चांग बोधला ’ ऊर्फ चंद्रभट नामक एका ब्राह्मणाचा उपदेश घेतला होता. या सर्वांच्या कथा महीपतिकृत संतचरित्रग्रंथांत दिल्या आहेत. (८७) गरुडटके=गरुडाचें चित्र काढलेला ध्वज. निंबराज=वरील पांच संतांपैकीं एक संत.

( ८९ ) आशंकित=शंकाकुल, साशंक. ( ९० ) वक्त्यार्चे=कवीचें, महीपतींचें. ( ९१ ) उदेला=उदय पावला. प्रारब्धगतीं=दैवयोगानें, सुदैवानें. ( ९२ ) लोहसंदुकेंत=लोखंडाच्या पेटींत. ( ९३ ) द्विगुण=दुप्पट. सभाग्य=भाग्यवान्. ( ९५ ) स्वदेशांत=महाराष्ट्रांत. वृत्ति पुरातन=जुन्या काळापासून परंपरेनें चालत आलेलें काम. ( ९८ ) बारा ज्योतिर्लिंगें=हिंदुस्थानांतील निरनिराळ्या बारा ठिकाणीं शंकराचीं १२ स्वयंभू लिंगें आहेत, त्यांना द्वादश ज्योतिर्लिंगें म्हणतात. त्यांचीं नांवें व स्थलें—रामेश्वर, हिंदुस्थानच्या दक्षिण टोंकास. मल्लिकार्जुन=मद्रास इलाख्यांत पूर्वघाटाच्या एका शिखरावर. भीमाशंकर= पुणें जिल्ह्यांत भीमानदीच्या उगमाजवळ. त्र्यंबकेश्वर=नासिक जिल्ह्यांत गोदावरीच्या उगमाजवळ त्र्यंबक येथें. घृष्णेश्वर=मोगलाईंत वेरुळाजवळ. नागनाथ=मोगलाईंत आवढ्या नागनाथ येथें. वैजनाथ=मोगलाईंत. सोमनाथ=काठेवाडांत. ॐकारेश्वर=नर्मदाकांठीं. महाकालेश्वर=उज्जनी येथें. विश्वेश्वर=काशी येथें. बद्रिकेश्वर=हिमालयांत. ( ९९ ) चोखडें=प्रेक्षणीय. येथें चोखडीं असें पाहिजे. सप्त पुऱ्या=अयोध्या, मथुरा, हरिद्वार, काशी, कांची ( कांजीवरम ), अवंती, द्वारका. ( १०० ) संकलित=संक्षिप्त, थोडक्यांत. ( १०१ ) भागीरथी=गंगा. भगीरथ राजानें हिला पृथ्वीवर आणली म्हणून हिला भागीरथी म्हणतात. ( १०६ ) वापी=विहीर. ( १०७ ) क्षेत्रीं=शेतांत. सघन=दाट. देसायांनीं=ग्रामाधिकाऱ्यांनीं; देसाई हा एक जुना हुद्दा आहे. ( १०८ ) भद्रासनीं=सिंहासनावर. ( १०९ ) घृत=तूप. (११०) गजवदनासी= गणपतीस. ( ११२ ) यामिनींत=रात्रीच्या वेळीं. पार्वतीसुत=गणपति. ( ११३ ) तांबूल=विडा. सुषुप्ति=स्वप्नावस्था, स्वप्नांत. ( ११५ ) रंगदेवता= गायनांत, भजनांत, कीर्तनांत किंवा व्याख्यानांत जो रंग भरतो तो. त्यालाच देवता म्हटलें आहे. ( ११८ ) आरक्त=तांबड्या रंगाचा ( विड्याचा डाग ). क्षाळिला=धुऊन टाकला. ( ११९ ) अवर्षणीं=अनावृष्टींत, पर्जन्याभावीं. उन्मनी=योगाचा अभ्यास करीत असतांना प्राप्त होणारी एक विशिष्ट अवस्था. या अवस्थेंत योगी गेला म्हणजे त्याला भूक लागत नाहीं असें म्हणतात. ( १२१ ) विरिंचीनें=ब्रह्मदेवानें. ( १२२ ) हिंवें फुटले=थंडीनें कुडकुडले. ( १२७ ) आरक्त=लालबुंद. ( १३२ ) राऊळाकडे=पांडरंगाच्या देवालयाकडे. ( १३३ ) सुवर्णपांकळ्या=गांजराच्या फांकीच्या जागीं सोन्याच्या फांकी दिसल्या. ( १३६ ) गलितकुष्टी=महारोगी, रक्तपित्या, कोड भरलेला. ती सुंदर=सुंदर स्त्री.

( १३७ ) चिळसलें मन=मनाला चिळस आली. ( १४२ ) अंबरा=आकाशाला ( १४३ ) समुद्राकारण=समुद्राला. ( १४८ ) मेखळा=कमरपट्टा, करगोटा, मुंजींतील कटिसूत्र. ( १४९ ) भीमरथींत=चंद्रभागेंत. ( १५० ) न लागतां पातया पातीं=डोळ्यांचीं पातीं लागतात न लागतात तोंच, तत्क्षणीं. ( १५९ ) वाळुवंटीं=चंद्रभागेकांठच्या वाळवंटावर. केली दिवाळी भाविकां=भाविकांना जणूं काय आनंददायक प्रसंग आणला. ( १६४ ) विबुध=देव. ( १६५ ) साबडें=साळेंभोळें ( १६८ ) घरचारी=गृहिणी. ( १७२ ) मयूरपिच्छें=मोरपिसें. ( १७७ ) विरूपाक्ष=श्रीशंकर. भक्तभूषण=भक्तांना भूषणांप्रमाणें वाटणारा किंवा भक्तांना जो भूषणें मानतो. ( २८१ ) टाकूनि जाती वर्णसोये=जातिभेद विसरून. ( २९० ) पुढती=पुनः ( १९४ ) सुकृत=पुण्य. ( २९६ ) यात्रेचा समुदाय फुटला=यात्रेला आलेले लोक आपापल्या गांवी जाऊं लागले. यात्रा ओसरली. खंतावला=दुःखी झाला, त्याला खंती वाटली. ( २०० ) अपर्णावर=शंकर. ( २०५ ) ठावो=ठावठिकाण, पत्ता.

## अध्याय ५ वा.

**ओवी १ ली. आदिस्तंभा**=सृष्टीच्या आधारस्तंभा, मूलस्तंभा. सायुज्य-उदारा=सायुज्यमुक्ति देण्याइतकें औदार्य आहे ज्याचें. ( २ ) भवबंधफांसोटी=संसारबंधनाचा पाश. तुटी=तुटातूट. ( ३ ) सहस्रमुखानेंही=शेषालाही. लेखा=मोजमाप. ( ९ ) प्रभंजनास=वायूला. ( १५ ) अंतरगुज=मनोगत. निजभक्तविजयकथा=आपल्या भक्तांच्या विजयाच्या कथा. ( १९ ) निज-भक्त जे अंतरंग=तुझे अंतरंगांतले-विशेष सलगीचे-भक्त. ( २० ) पुढें करिसिल=देऊं करशील. ( २९ ) उठाउठी=घाईघाईनें. ( ३० ) निपजलें असेल=तयार केलें असेल. विस्तारून=वाढून. ओलेंकोरडें=जाडेंभरडें, गरि-बीचें. ( ३४ ) शाकेसी=तोंडीं लावण्यास, रुचीसाठीं. ( ३५ ) कदन्न=हलकें अन्न. ( ३७ ) श्रीकृष्ण शिष्टाईसाठीं दुर्योधनाकडे गेले असतां दुर्योधनानें त्यांच्यासाठीं नानाप्रकारचीं पक्वान्नें करून त्यांना जेवावयास बोलाविलें, परंतु त्याच्या आमंत्रणाचा स्वीकार न करितां भगवान्, आपला भक्त जो विदूर त्याच्या घरीं गेले आणि त्याच्या घरच्या कण्या त्यांनीं मोठ्या आवडीनें खाल्ल्या. ( ३८ ) पांडव वनवासांत असतां, दुष्ट दुर्योधनानें, त्यांचें सत्त्वहरण करण्यासाठीं, दुर्वासऋषींस, त्यांच्या शिष्यांसह, अपरात्रीं, पांडवांकडे पाठविलें.

तेव्हां द्रौपदीनें श्रीकृष्णांचा धांवा केला.त्या वेळीं भगवान् जेवावयास बसले होते. द्रौपदीची हाक कानीं पडतांच, समोरचें ताट दूर लोटून भगवान् द्रौपदीपाशीं गेले आणि "मला भूक लागली आहे, कांहीं तरी खावयास दे" असें म्हणाले. द्रौपदीपाशीं त्यांना देण्यासारखें कांहीं नव्हतें. तेव्हां, स्थालींत एक भाजीचें पान चुकून राहिलें होतें तेवढेंच खाऊन त्यांनीं ढेंकर दिला आणि ऋषींस पोटभर जेऊं घालून, पांडवांच्या सत्त्वाचें रक्षण केलें. ( ३९ ) भिल्लिणीचीं उच्छिष्ट फळें । भक्षी घननीळ निजप्रीती=श्रीराम वनवासांत असतां एका भाविक भिल्लिणीनें त्यांना कांहीं बोरें मोठ्या प्रेमानें अर्पण केलीं. तीं बोरें गोड आहेत कीं आंबट आहेत हें समजून घेण्यासाठीं तिनें तीं अगोदर आपल्या दांतांनीं चावून पाहिलीं होतीं व तीं उष्टीं बोरें भगवंतांनीं मोठ्या आवडीनें खाल्लीं ( ४३ ) वियोगहिंपुटी=वियोगदु:खी ( माझ्या वियोगानें दु:खी होऊं नकोस. ) ( ४६ ) कामना धरूनी=कांहीं तरी इच्छा मनांत धरून. पुराण-व्युत्पत्ति=अभ्यास करावा न लागतां पुराणाचा अर्थ सांगतां यावा. ( ४७ ) दृष्टांत दाविला=खुणेनें सांगितलें, स्वप्नांत येऊन सांगितलें. ( ४९ ) अलकावतीसी=आळंदी येथें. तेथें ज्ञानदेवांची समाधि आहे. ( ५४ ) विकल्पी=संशयी. प्राकृत=मराठी. ( ५५ ) प्राक्तनहीन=दुर्दैवी. ( ५६ ) निधान=पुरलेलें द्रव्य. ( ५७ ) भागीरथीची कुपी=गंगेच्या पाण्यानें भरलेली कुपी. उन्मत्तासी भासे मद्यपान=दारूबाजाला ती कुपी दारूनें भरलेली आहे असें वाटतें. डावलून=बाजूस टाकून. ( ५८ ) ज्ञानराजाला=ज्ञानदेवांना. ( ५९ ) उचित=योग्य ती वस्तु, इच्छित वस्तु. ( ६० ) एकादश अभंग=त्या ब्राह्मणाला ( तुकोबांनीं ) दिलेले ११ अभंग. महाफळ=नारळ. सवेग=त्वरेनें. ( ६२ ) ब्राह्मणजन=आचारी, शागीर्द. ( ६९ ) साकल्यें=विस्तारेंकरून. ( ७० ) गीर्वाण भाषा=संस्कृत भाषा. ( ७५ ) देवासी=चिंतामणि देवांना. ( ७६ ) मताभिमान करून=आपल्याच मताचा अभिमान धरून. हेळण=अवहेलना, कुचेष्टा. ( ७७ ) पाचारूनि=बोलावून. ( ७८ ) ब्राह्मणभक्त=ब्राह्मणांविषयीं आदर बाळगणारा. ( ८५ ) हिलाल=मशालीसारखी प्रकाश देणारी एक वस्तू. ( ८७ ) चांभारगोंदें= हें गांव अहमदनगर जिल्ह्यांत आहे. ज्ञानसागर=ज्ञानी. शेख महंमद=पूर्वी यांची थोडी माहिती दिली आहे. यांचा 'योगसंग्राम' या नांवाचा एक ओवी-बद्ध ग्रंथ व इतर कांहीं फुटकळ कविता आहे. ( ८९ ) आरोगिले मूग=मूग

गिळून बसले, तोंडें बंद झालीं. (९०) वक्तयानें=शेख महंमदांनीं. (१००) एक जाहले असती=एकरूप झाले होते, आपपर भाव हरपला होता. (१०३) एकवटें=एकवट, एकत्र. (१०४) प्रतिमा=मूर्ति. उपकरण=पूजापात्र. (१०५) घृत=तूप. नवनीत=लोणी. (१०९) सांडणी=सांडणीस्वार. (११४) मीन नीटचि धार चढती=उंचावरून खालीं पडणाऱ्या पाण्याच्या धारेंत खालचे मासे वर चढून जातात. (११६) पिपीलिका=मुंगी. अंतरिक्ष=आकाश. विहंगम=पक्षी. (१२०) सिंहावलोकनें=मागील संदर्भ लक्षांत घेऊन. सिंह चालतांना मध्येंच थांबून मागें पाहतो त्यावरून हा शब्द रूढ झाला आहे. (१२७) विदेही होऊनि=देहभान विसरून. (१२७) मकरंद=फुलांतला मध, केसर. महीपतींनीं येथें सुगंध या अर्थी हा शब्द वापरला आहे. (१३०) त्यांकारण=त्यांना. (१३२) तेथून=चिंचवडाहून. (१३३) कृपावलोकनीं= कृपेनें अवलोकन करून, कृपा करून. (१३६) सरितानाथ=समुद्र. नद्या समुद्रास मिळतात म्हणून त्याला सरितानाथ म्हणतात. (१३८) लोहरज=लोखंडाचे कण. (१३९) कडोविकडीं=नानापरींनीं आळवून. (१४१) धरामर= पृथ्वीवरील देव, भूदेव, ब्राह्मण. (१४६) निखळ=मूळ निखिल म्हणजे सर्व. (१४७) मनुष्यरहाटी=(याच्या सर्व शरीरांत कापूस भरलेला असतां) मनुष्याप्रमाणें याचे सर्व व्यापार कसे चालतात? (१४८) रुधिर=रक्त. चैतन्य=चिच्छक्ति, जीव. (१४०) पंचभूतांचें=पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश हीं पंचमहाभूतें. अडंबर=अवडंबर. जीवासी लाविलें प्रपंच काबाडें= संसाराचे काबाडकष्ट. (१५०) याविरहित=ज्याच्यामागें ही उपाधि नाहीं असा. प्राकृत=सामान्य, इतर माणसांसारखा. (१५३) अंडजयातीमाजी=पक्ष्यांमध्यें. सुपर्ण=गरुड. गौण=अयोग्य, उणी. (१५५) प्रांजल=सरळ. (१५६) येरु=येर म्हणजे दुसरा, तुकाराम. (१५७) आमुचा स्वामी भृगूची लात०=भृगु ऋषीनें, कोणता देव श्रेष्ठ हें ठरविण्याकरितां देवांची परीक्षा पाहण्यासाठीं विष्णूंच्या छातीवर लाथ मारली तेव्हां विष्णूंनीं न रागावतां उलट "माझ्या दगडासारख्या कठीण छातीवर आपण लाथ मारल्यामुळें आपला पाय दुखावला असेल" असें म्हणून ऋषींच्या पायांचें संवाहन केलें, व लाथेमुळें छातीवर जो वळ उठला तो भूषणाप्रमाणें मानिला. (१६१) जे=कीं, कारण कीं. (१६४) लोहोगांव=पुणें जिल्ह्यांत आहे. (१६५) धणीवरी=पोटभर, तृप्ति होईपर्यंत. प्रेमामृतलहरी=हरिप्रेमरूप अमृताचा चषक.

( १६६ ) विनीत=विनम्र. ( १६७ ) ब्राह्मणसंतर्पण=ब्राह्मणभोजन. ( १७० ) व्यवसायी=व्यापारी. ( १७१ ) येथें तुज निद्रा लागली कैसी ?=घोड्यावर बसून तूं झोंप कशी घेतोस ? घोड्यावर बसलेला असतांना तुला झोंप कशी येते ? ( १७२ ) त्यांकारण=त्यांना. ( १७४ ) अर्थ—ज्या ठिकाणीं ( लोहगांवांत ) तुकोबांसारख्या प्रेमळ भगवद्भक्ताचें कीर्तन होत असतें, तेथें आपलें कीर्तन-कौशल्य लोकांस रुचणार नाहीं. ज्याप्रमाणें एखाद्या रोग्याला दिव्य अमृत मिळाल्यावर तो औषध कधींही घेणार नाहीं. ( १७५ ) कांचमणी=कांचेचे मणी. ( १७६ ) धीटपाठ=सहजस्फूर्तीनें कीर्तन न करितां, विद्वत्तेच्या जोरावर व गायनादि मनोरंजक प्रकारांच्या साहाय्यानें धंदेवाईक कीर्तन करणें. ( १७७ ) डावलोनियां=बाजूस टाकून, सोडून. ( १८२ ) धांवणार=धावणेकरी, जासूद. ( १८७ ) देशावर करूनी=वर्गणी जमवून. ( १८९ ) वस्तीकर= राहणारे, नागरिक. ( १९० ) असाम्या मांडोन दीधल्या=कोणाकोणाकडून वर्गणी घ्यावयाची त्यांचीं नांवें लिहून दिलीं. ( १९१ ) पत्रीं अंक घालावा= कोणी किती वर्गणी द्यावयाची तो आंकडा त्याच्या नांवापुढें घालावा. ( १९२ ) तूळ=एक रुपया. टाळी=आठ आणे. पकार=पावली, चार आणे. ( १९४ ) मुळु=पांच रुपये. उत्तमावरी=श्रीमंताच्या नांवापुढें. उदाणूकें=तीन रुपये. मध्यमावरी=साधारण श्रीमंत अशा मनुष्याच्या नावापुढें. कनिष्ठावरी=सामान्य मनुष्याच्या नांवापुढें. एक आंख=एक रुपयाचा आंकडा. (१९६) उकलोनि= वसूल करून. मुख्य जे म्हणवीत होते थोर=जे स्वतःस थोर म्हणवीत होते असे मुख्य मुख्य लोक, पुढारी. ( १९८ ) दातियांच्या=दात्यांच्या. चित्तांतरीं= मनांत. ( १९९ ) मक्षिका=माशी. लवणकणिका=मिठाचा खडा. प्रेमळांमाजी लटिका । कुटिल येऊन बैसला=प्रेमळ लोकांच्या समुदायांत थापेबाज कपटी मनुष्य येऊन बसला. ( २०१ ) पश्चिम धान्यावरी=उन्हाळी पिकावर. तांबारा= पिकाचा नाश करणारा एक प्रकारचा जंतुजन्य रोग. ( २०२ ) वोळल्या पर्जन्यधारा=आकाशांत पाऊस भरून आला. दक्षिणवारा=दक्षिणदिशेकडून वाहणारा वारा. हा वारा पावसाचा जोर कमी करतो असें म्हणतात. राहु प्रगटला त्या-आड=राहूनें त्याला ग्रासलें, ग्रहण लागलें. (२०३) बोहरी=निरसन, नाश. परी= उपाय, प्रकार. ( २०४ ) चुकलें वांकलें गांवांत । राहूं सर्वथा न द्यावें=ज्याच्या-कडून वर्गणी मिळाली नाहीं असा एकही मनुष्य गांवांत राहूं देऊं नका. ( २०५ ) दुर्बळ=दरिद्री. साळी=कोष्टी. ( २०६ ) भक्त प्रेमळ=तुकोबा. रुका

अधेला=पैसा अर्धापैसा. ( २०९ ) पांजणी=विणलेल्या वस्त्रांस खळ लावीत होता. ( ११४ ) संसारा पाडूनि तुटी=संसाराचें वाटोळें करून. ( २१९ ) उदकपात्र=पाणी पिण्याचें भांडें, तांब्या. ( २२१ ) दावाग्नि=वणवा. शेरास= हुऱ्याचे झाडास. ( २२२ ) घर्म दटला=घाम आला. ( २२३ ) जे=कीं. उदारत्व धरी=औदार्य दाखवी. ( २२७ ) उजळोनि=घांसून. कांचनाऐसें= सोन्याच्या भांड्यासारखें. ( २२८ ) तांवूनि=तापवून. ( २३२ ) उकळोनि= वसूल करून. ( २३३ ) ग्रामवासी=या गांवांत राहणारा, नागरिक. परमशठ= महा लुच्चा. ( २३५ ) तल्लीन=येथें आश्चर्यचकित किंवा लज्जित असा अर्थ घ्यावा. ( २४२ ) घृत=तूप. (२४४) सिधासाहित्य=भोजनाची सामग्री. (२४७) स्वप्नसंभ्रम=स्वप्नांतला देखावा. ( २४९ ) घरीं कलह मांडिला थोर=(तुपासाठीं) घरीं बायकोनें आपल्याशीं मोठें भांडण केलें. ( २५० ) केशव चैतन्य, राघव चैतन्य व बाबाजी चैतन्य या नांवाचे चैतन्य सांप्रदायी तीन सत्पुरुष तुको- बांपूर्वी महाराष्ट्रांत होऊन गेले. त्यांपैकीं बाबाजी चैतन्य हे तुकोबांचे गुरु. हे समाधिस्थ झाल्यावर यांनीं स्वप्नांत तुकोबांस उपदेश दिला. ( २५१ ) त्रिपुरारी=श्रीशंकर ( २५२ ) या ओवींत, ज्या दिवशीं स्वप्नांत गुरूपदेश झाला ती तिथि दिली आहे. ( २५७ ) कर्ममार्ग=वेदप्रतिपादित स्नानसंध्या व यज्ञयागादि मार्ग. आन=अन्य, दुसरें. ( २५८ ) गंडिकामूर्ति=गंडकी शिळेची मूर्ति, शाळिग्राम. ( २५९ ) जळती=जळफळतात. ( २६१ ) अंबऋषी=राजा अंबरीष, सूर्यवंशीय नाभागाचा पुत्र. हा मोठा भगवद्भक्त, दानशूर, व परा- क्रमी होता. यानें सात दिवसांत सर्व पृथ्वी जिंकली. एकदां यास, नित्याप्रमाणें कार्तिकांतील त्रिदिनात्मक एकादशीचें व्रत असतां, द्वादशीचे दिवशीं दुर्वास ऋषि याचे घरीं आले. अंबरीषानें त्यांचें पूजन करून त्यांना भोजनास राह- ण्याची विनंति केली. 'ठीक आहे' असें म्हणून दुर्वास नदीवर स्नानास गेले. इकडे द्वादशी तिथि संपत आल्यानें, व्रतभंग होऊं नये म्हणून राजानें ब्राह्मणांच्या संमतीनें तीर्थप्राशन करून पारणें केलें. दुर्वासांस हें आवडलें नाहीं. ते संतापले व त्यांनीं आपल्या जटेंतील एक बट काढून जमिनीवर आपटली. तेव्हां तिच्यापासून एक राक्षसी उत्पन्न झाली ती त्यांनीं राजाच्या अंगावर सोडली. राजा भगवद्भक्त असल्यामुळें विष्णूंनीं त्याच्या संरक्षणार्थ सुदर्शन चक्र सोडलें. त्या चक्रानें राक्षसीचा वध केला व तें दुर्वासांच्या मागें लागलें.

तेव्हां ते त्रस्त होऊन पळत सुटले. शंकर, ब्रह्मदेव, विष्णु यांजकडे ते गेले व विष्णूच्या सांगण्यावरून परत अंबरीषाकडे आले. त्यानें चक्राची स्तुति करून त्याला शांत केलें व नंतर दुर्वासांना भोजन घालून स्वतः भोजन केलें. (२६६) विक्षेप फार वाढला=(तुकोबांस) फार खेद झाला. (२६७) कांचेची कुपी ओतिली= सांच्यांत कांचेचा रस ओतून कुपी बनविली. पट्टकूलाची=रेशमी वस्त्राची. पावकें=अग्नीनें. (२६८) अजापाळें=धनगरानें. बनकराला=माळ्याला. (२६९) वैष्णवभक्तां विक्षेप=वैष्णव म्हणजे वारकरी, त्यांना देवपूजेस तुलसी-पत्रें लागतात. तुळशीचीं झाडें बोकडानें खाल्लीं तर त्यांना जसें दुःख होतें त्याप्रमाणें. (२७१) मुक्ताफळ=मोतीं. जोहरी=जवाहिऱ्या. (२७३) धरणें=हट्ट धरून बसणें; अमुक गोष्ट घडल्याशिवाय आपण येथून उठणार नाहीं असा हट्ट धरून बसणें. (२७४) अरिष्ट उठवोनियां=संकट उपस्थित करून. (२७५) मतिमूढासि=मतिमंदाला, निर्बुद्धाला. नामदेवाची बाकी राहिली=नामदेवांनीं शतकोटि अभंग रचण्याची प्रतिज्ञा केली होती, त्यांपैकीं त्यांच्याकडून जेवढे अभंग व्हावयाचे राहिले ते. (२८३) अक्षरांलागीं जीवन। आतळलें नाहीं सर्वथा=वह्यांतलि अक्षरांना पाण्याचा स्पर्श बिलकुल झाला नाहीं. (२८७) अपाय=विघ्न, उपद्रव. (२९२) पंढरीनिवास=पांडुरंग. (२९३) बद्धां-जली=हात जोडून. सात अभंग=हे अभंग फार प्रेमळ आणि हृदय हालवून सोडणारे आहेत. जिज्ञासूंनीं गाथ्यांत पहावे. (२९४) लाविलीं नेत्रपातीं=डोळे झांकले. (२९६) यातिहीन=हलक्या जातीचा. (२९७) कोडें=संकट, सांकडें. (२९९) निगुतीं=मुद्दाम. (३००) तुजकारण=तुला. (३०१) एकदां चुकी पडली=एकदां हातून चूक झाली. (३०३) पुढती=पुनः, परत. (२०५) आघात=तडाखे. (२०६) स्वल्पासाठीं=अल्प लाभासाठीं. (२०८) शशी-परी=चंद्राहून. माउलीपरीस=आईपेक्षां. कल्लोळ=लहरी. (३०९) अनिर्वाच्य= वाचेनें वर्णितां येत नाहीं असा. (३१०) त्यापरता=त्याच्यापेक्षां, अमृतापेक्षां. (३११) संसर्ग=संबंध. (३१५) अंतर्गाभारांत=आंतल्या गाभाऱ्यांत, देहू येथील विठ्ठलमंदिरांतील विठ्ठलमूर्ति ज्या गाभाऱ्यांत आहे त्यांत. (३१६) पुढें देहासहित तुकाराम जाण। वैकुंठभुवना पातला=तुकाराममहाराज सदेह वैकुंठास गेले अशी आख्यायिका असल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे. तुको-बांच्या समकालीन व उत्तरकालीन अनेक संतकवींनीं या गोष्टीचा उल्लेख

आपल्या कवितेंत केला आहे. (३१८) दत्तात्रेय अनसूयासुत=अत्री ऋषींची पत्नी अनसूया ही दत्तात्रेयाची माता. विचरत=हिंडत असतो. (३१९) निळोबाचे स्वप्नीं येऊनी। उपदेश केला निजकृपें=निळोबा हे तुकोबांच्या परंपरपलें एक मोठे साधु तुकोबांचें निर्याण झाल्यावर निळोबांस त्यांनीं स्वप्नांत उपदेश दिला अशी कथा आहे.

——:०:——

## शुद्धिपत्र

विद्यार्थ्यांनीं कृपा करून या शुद्धिपत्राप्रमाणें ओव्यांत दुरुस्ती करून मग पुस्तकाचा उपयोग करावा.

| पृष्ठ | ओवी | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २३ | ८८ | धृत | घृत |
| ५३ | ७१ | ऐका | ऐक |
| ५४ | ८९ | जीवितां | जीविता |
| ५६ | ११७ | घ्यानासी | ध्यानासी |
| ६५ | १९ | खद्यौत | खद्योत |
| ६६ | ३८ | गर्जेंद्रांसी | गर्जेंद्रासी |
| ७० | ८७ | दिपकासी | दीपकासी |
| ७३ | १२६ | तू | तूं |
| ७५ | १४५ | विष्ठुरता | निष्ठुरता |
| ७५ | १४८ | कांरडें | कोरडें |
| ८२ | ४४ | तयार | तयावर |
| ८३ | ५८ | श्रवणी | श्रवणीं |